किंमत १ रुपया

नाथमाधव कृत

# गजेंद्र मोक्ष



०—(हांसत हांसत) असें म्हणून कसं चालेल ! आतां तुझ्या ची मालकी सर्वस्वी आमचीच होणार आहे.

पान ८७.

The Bombay Art Printing Works, Fort.

# गजेंद्रसिंग नाटक.

अंक पांच.

—:०:—

लेखक,

श्रीयुत नाथ माधव.

दादर, मुंबई.

( प्रेमवेडा, परवांची गोष्ट, बंगाल्यांतील १ लें गुप्त मंडळ, सायंकाळची करमणूक, तरुण रजपूत सरदार, वीरधवल, प्रेम आणि सूड, रात्रीची मौज, शिक्षण इत्यादि पुस्तकांचा कर्ता )

प्रकाशक,

नरहर नारायण पटवर्धन.

संपादक—' मकरन्द ' मासिक.

वाई.

१९११

मुद्रकः—केशव रावजी गोंधळेकर.

जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.



# दोन शब्द.

' तरुण रजपूत सरदार ' नांवाची एक ऐतिहासिक कादंबरी मीं मागें लिहिली. त्यांतील कथानक फारच चित्तवेधक असल्यामुळें त्या कथानकावर मीं एखादें नाटक लिहावें अशी माझ्या मित्रमंडळींनीं आग्रहाची सूचना केली; ती मला पसंत पडून मीं हा प्रस्तुतचा प्रयत्न केला आहे.

क्षत्रियांच्या व रजपुतांच्या वीर्य पराक्रमाचे इतिहास वाचावयास फार मनोरम व अद्भुत असून, त्यांच्या योगानें अंतःकरणांत एक प्रकारचा उत्साह उत्पन्न होतो. उत्तरेकडे शिसोदिया वंश जसा पराक्रमी व अभिमानी असून त्याचा इतिहास तिकडे पूज्य व अभिनंदनीय आहे, तसा त्याच कुळांत इकडे उत्पन्न झालेले छत्रपति श्री शिवाजी महाराजांचा इतिहास लोकांना प्रोत्साहक व मनोरम वाटतो. शिसोदिया वंशरूपी सहस्ररश्मी प्रभाकराचें कोठें एक किरण दक्षिणेकडे आलें व त्यांत वरील शिवरत्न उत्पन्न होऊन त्यानें आपलें तेज प्रगट केलें. परंतु राज्पुतान्यांत त्यांच्या किरणांत प्रकाशमान झालेलीं सहस्रावधि नररत्नें जेथें आपल्या तेजानें लोकांचे नेत्र दिपवून नाहींशीं झालीं, त्यांपैकीं एका रत्नाच्या चरित्रांतील हा कथाभाग आहे.

प्रस्तुतच्या नाटकांत शृंगार, वीर, करुण, भयानक, हास्य वगैरे रस दाखविण्याचा शक्य तितका प्रयत्न केला आहे, तो कितपत साधला आहे, हें पाहणें मी रसिक वाचकांवर सोंपवितों.

लेडी जमशेटजी रोड,<br>दादर, मुंबई. मे १९११.

नाथ माधव.

# मुख्य पात्रें.

राजा मानसिंग ........................अंबराधिपति.
प्रमिला ........................राणी.
उदयसिंग ........................सरदार ( राजाचा मित्र ).
रूपसीसिंग ........................सरदार ( राजाचा मित्र ).
गजेंद्रसिंग ........................सरदार ( नायक ).
धोलासिंग ........................नगराचा कोतवाल.
सहिदसिंग ........................नगराचा कोतवाल.
चंपावती ........................उदयसिंगाची स्त्री.
प्रमोदिनी ........................ ,, मुलगी ( नायिका ).

## इतर पात्रें.

( रजपूत, त्याची स्त्री, गुरुमहाराज, ज्योतिषि, पुरोहित, भट, स्वार, मोरेकरी, शिपाई, जमादार आणि दासदासी इत्यादि. )

## स्थळ.

अंबरनगर आणि जयपूर.

# गजेंद्रसिंग नाटक.

## अंक १ ला.



## प्रवेश १ ला.

—:०:—

**स्थळः**—अरवली पर्वताच्या आसमंतांतील प्रदेश.

( शिकारीच्या वेषानें प्रमोदिनी आणि धोलासिंग येतात. )

**धोलासिंग**—ताईसाहेब, शिकारीकरितां ना आपण येथें आलों? मग असें कां! जवळ जवळ दोन घटका झाल्या—इतकी शिकार जवळून जात असतांनाहि चापाला तुह्मी हात घालीत नाहीं, मग शिकार ती काय करणार?

**प्रमोदिनी**—( इकडे तिकडे पाहून ) पण ती जागा दाखवितां ना मला?

**धोला०**—कुठली जागा!

**प्रमो०**—ती—काल तुह्मी सांगितलीत ती! तेवढ्याकरितां तर आज मी तुमच्याबरोबर शिकारीच्या निमित्तानें आलें.

**धोला०**—हं, हं, आतां आलें लक्षांत! हीच नव्हे का ती जागा! ह्याच ठिकाणीं अलीकडे गजेंद्रसिंग नित्य नियमानें येऊन आपल्याच चिंतनांत तासाचे तास घालवीत असतो. दोन चार वेळां त्याच्या चिंतेचें कारण मीं त्याला विचारलें, परंतु तो मला दादच

देईना. ह्मणून त्या दिवशीं मीं तें सर्व बाबासाहेबांस सांगितलें. अलिकडे तो चिंतेंत असतो तें बाबासाहेबांच्याहि लक्षांत आलें होतें ह्मणून मुद्दाम त्याला आपणाबरोबर त्यांनीं जयपुरांत नेलें आहे. परवां ओरिसा प्रांत काबीज करतांना ज्या शूर योध्यांनीं योग्य कामगिरी बजाविली, त्यांच्या सत्कारार्थ महाराज मोठा दरबार भरविणार आहेत; त्यांत गजेंद्रसिंगाचाहि, त्यानें दाखविलेल्या शौर्याबद्दल, सत्कार होऊन दोन दिवस थारेपालट होईल.

**प्रमो०**—पण त्यांच्या चिंतेचें कारण काय असेल असं तुह्मांला वाटतं ?

**धोला०**—काय सांगावं !

**प्रमो०**—( बोट दाखवून ) धोलासिंग, तो धूर कसला दिसतो आहे, पहा.

**धोला०**—कुठें ? ( पाहून ) होय, दिसतो खरा—त्या उंचवट्यावर चढलं म्हणजे ह्याच्याहून आणखी स्पष्ट दिसेल. ( जातो. )

**प्रमो०**—( गहिंवर येऊन ) गजेंद्रसिंगजी, बालपणापासून प्रत्येक गोष्ट तुम्हीं मला विश्वासानें सांगत आलांत, तो विश्वास आतां कुठें गेला ! आपल्या चिंतेचें कारण मीं कितीदां तरी विचारलें—परंतु नाहीं !—एखाद्या दीनवाण्याप्रमाणें ह्या एकांत स्थळीं येऊन तासाचे तास घालवितां, त्यांत तुम्हांला सुख वाटतं कां ? ( धोलासिंग येतो. ) आपल्या आनंदी वृत्तींत असा कां बदल झाला ! पूर्वींप्रमाणें हांसणें खेळणें सर्व सोडून, हा एकांतवासच कां बरें आपणांस अधिक प्रियकर वाटूं लागला !

**धोला०**—( स्वगत ) हें खऱ्या प्रेमाचें चिन्ह दिसतें.

**प्रमो०**—आतां मी करतेंच मनाचा निश्चय आणि बाबांबरोबर

जयपुराहून येणं झालं कीं, विचारून घेतेंच त्यांना त्यांच्या चिंतेचें कारण—पण मला ते सांगतील का ? माझ्यावर त्यांचें प्रेम असेल का?

**धोला०**—( पुढें होऊन ) ताईसाहेब, बहुतकरून ती आपलीच मंडळी जयपुराहून परत येत असावी.

**प्रमो०**—खरं कीं काय ? चला तर लवकर परत.

[ जातात. ]

---

## अंक ] प्रवेश २ रा. [ पहिला.

स्थळ:—वाड्याचा दरवाजा.

( गजेंद्रसिंग येतो. )

**गजेंद्रं०**—( मागें वळून पहात ) अद्यापि आमच्या मंडळीनें बटेवा नदी ओलांडली नाहीं तोंच मी वाड्यांत येऊन पोहोंचलों. किती हें माझें मन उतावीळ! मन उतावीळ ह्मणण्यापेक्षां हें एक प्रेम—लोहचुंबकच ह्मणावयाचें!—हा माझा पोशाख, हे माझे अलंकार, तसेंच महाराजांनीं हजार स्वारांची मनसबदारी देतांना दिलेली ही विजया, ( म्यानांतून तरवार बाहेर काढितो. ) मी प्रमोदिनीला केव्हां दाखवितों असें झालें आहे. मला सरदारी मिळालेली पाहून तिला किती तरी आनंद होईल! आतां मी बाबासाहेबांच्या योग्यतेचा सरदार झालों. ह्या योग्यतेकरितांच आजपर्यंत प्रमोदिनीविषयींचें प्रेम मला गुलदस्तांतल्या प्रमाणें दडपून ठेवावें लागलें, तें तिच्या जवळ उघड करण्याचा आज दिवस उगवला! आज माझ्या प्रेमाला प्रमोदिनीचें प्रेम मोबदला मिळणार आहे. ( जातो. )

[ दिवाणखान्यांत कोचावर प्रमोदिनी बसली आहे असा देखावा. ]

**प्रमो०**—( कानोसा घेऊन ) पावलें वाजताहेत कुणाचीं—कोण

आहे? ( गजेंद्रसिंग प्रवेश करितो ) कोण गजेंद्रसिंग!—केव्हां आलांत?—बाबा कुठें आहेत?—महाराजांनीं का इतक्या तांतडीनें बोलावणं पाठविलं होतं?—( त्याला नखशिखांत पाहून ) अगबाई! आजचा तर हा कांहीं निराळाच दिसतो आहे थाट!

**गजेंद्र०**—( पुढें होऊन ) प्रमोदिनी, आजपर्यंत ह्या हृदयांत मोठ्या कष्टानें सांठवून ठेविलेली एक गुप्त गोष्ट तुला सांगण्याकरितां मी येथें मुद्दाम आलों आहें. महाराजांनीं मला आणि बाबांना जयपुरांत बोलाविण्याचें कारण—त्यांनीं मला एक हजार स्वारांची सरदारी देऊन हा पोशाख—ही विजया बक्षिस दिली आहे. आजपासून माझी सरदारांत गणना झाली. आजपासून इतर सरदारमंडळींत मिळून मिसळून वागण्याचा अधिकार मला आला. तो अधिकार आजवर मला नव्हता ह्मणून माझ्या अंतःकरणांतील ती गुप्त गोष्ट तशीच दडपून ठेवावी लागली. पण—ती—गुप्त गोष्ट आतां सांगतों. प्रमोदिनी, मी तुझ्यावर प्रेम—अंतःकरणापासून प्रेम करितों. आज किती वर्षें तुझ्या प्रेमाचा खजीना ह्या हृदयांत सांठवून ठेवीत आलों आहें. परंतु आजवर माझी योग्यता नसल्यामुळें मला बोलतां आलें नाहीं. परंतु आतां—आतां मी सरदार झालों; तुझ्या घराण्याच्या योग्यतेला चढलों—तेव्हां तूं माझी व्हावीस, प्रमोदिनी, तूं माझी व्हावीस ही इच्छा! होशील ना? बोल—प्रमोदिनी बोल, माझें सर्व अंतःकरण तुला उघड करून सांगितलें—माझें सर्व जीवित आतां तुझ्या हातांत आहे. (थोडा वेळ थांबून) एक शब्द—प्रमोदिनी, एकच शब्द बोल—'हो' म्हणून ह्मण! बस्स्—मग मी जास्त कांहींच विचारीत नाहीं.

**प्रमो०**—( त्याच्या गळ्याला एकदम मिठी मारून ) होय.

**गजेंद्र**०—[ तिची हनुवटी धरून ] माझी होशील ना?—माझ्या जन्माची सोबतीण?—माझ्या सुखाची—अर्धांगी—

**प्रमो**०—होय, सर्वस्वी मी तुमचीच आहें. ( गजेंद्रसिंग तिला हृदयाशीं धरितो दोघें कोंचावर बसतात. )

**गजेंद्र**०—प्रमोदिनी, उद्यां ही गोष्ट मी बाबासाहेबांच्या कानावर घालतों. तितक्यांत आईसाहेबांकडून तूं अनुमोदन घे.

**प्रमो**०—( पावलांचा आवाज ऐकून ) बाबा आले वाटतं !

( उदयसिंग येतो. दोघेहि उभें राहतात. )

**उदय**०—( त्यांच्याकडे पहात ) काय चाललं आहे बाळे ?

**गजेंद्र**०—( पुढें होऊन ) बाबासाहेब, आजवर एक गुप्त गोष्ट मीं आपणापासून लपविली होती; ती ह्यापूर्वींच आपल्या लक्षांत आलीहि असेल, ती आतां सांगतों. मी तुमच्या प्रमोदिनीवर प्रेम करतों, आणि तीच गोष्ट मी आतां तिला सांगत होतों.

**उदय**०—( भुंवया आकुंचित करून ) हं!—आणि ती काय ह्मणाली!

**प्रमो**०—( लडिवाळपणानें बापाचा हात धरून ) बाबा, मीहि त्यांच्यावर अंतःकरणापासून—

**उदय**०—( रागानें तिला झिडकारून ) बाळे, हा काय गोंधळ आहे ? ( गजेंद्रसिंगाकडे वळून ) गजेंद्रा, ह्यापूर्वीं तुझ्या ह्या गुप्त प्रेमाबद्दल मीं पूर्ण नापसंती दर्शविली असतां, प्रमोदिनीजवळ त्या गोष्टीचा उच्चार करण्याचें तुला धैर्य तरी झालें कसें ?—माझ्या प्रमोदिनीची योग्यता कुठें आणि तुझी—

**गजेंद्र**०—मीहि प्रमोदिनीच्या योग्यतेचा झालों आहें बाबासाहेब. महाराजांनीं मला सरदारी दिली—

उदय०—आणि त्या सरदारीच्या जोरावर तूं आपलें प्रेम तिजजवळ व्यक्त केलेंस, होय ना ?

गजेंद्र०—होय.

उदय०—मूर्ख कुठला !—अरे, तूं सरदार झालास, तरी स्वतःच्या कुळाचा कांहीं तरी विचार करावयाचा होतास !—गजेंद्रा, आतां तुला स्पष्टच सांगतों, माझी प्रमोदिनी कधींहि तुझी पत्नी होणार नाहीं.

प्रमो०—बा—बा—( एक श्वास सोडून कोचावर बेशुद्ध पडते. गजेंद्रसिंग तिला सांवरण्याकरितां जाऊं लागतो. )

उदय०—( त्याला आडवून ) थांब, तूं जाऊं नकोस. कोण आहे बाहेर ? ( एक दासी प्रवेश करते ) सहिदे, हिला सांभाळ. जा—गजेंद्रा, तूं आतां जा—

गजेंद्र०—पण बाबासाहेब, मीं जर मोठी कीर्ति मिळविली तर प्रमोदिनीची—मला—आशा—

उदय०—प्रमोदिनीची आशा !—नाहीं—स्वप्नांत नाहीं.

[ पडदा पडतो. ]

---

## अंक ] प्रवेश ३ रा. [ पहिला.

—:o:—

स्थळः—उदयसिंगचा वाडा.

( गजेंद्रसिंग प्रवेश करतो. )

गजेंद्र०—आजपर्यंत माझा प्रेमानें प्रतिपाळ करून बाबासाहेबांनीं कोणच्याही गोष्टींत माझी नाउमेद केली नाहीं. परंतु काल त्यांचीं एकाएकीं मजवर इतकी कां बरें नाराजी झाली ? प्रमोदिनीची मागणी केली म्हणून ? इतकं कां माझं कूळ नीच आहे ? थोर सरदार मंड-



गजेंद्र०—पण बाबासाहेब, मी जर मोठी कीर्ति मिळविली तर प्रमोदिनीची—मला—आशा—

पान ६.

ळांत माझी गणना नाहीं का? माझें कूळ जर नीच असतें तर आजवर आपल्या बरोबरीनें त्यांनीं कधींहि मला वागविलें नसतें— असं जर आहे तर प्रमोदिनी मला कां मिळूं नये? ( धोलासिंग येतो. )

**धोला०**—गजेंद्रसिंग, तुला बाबासाहेब बोलावितात.

**गजेंद्र०**—धोलासिंगजी, मी तुम्हाला एक प्रश्न विचारतों—विचारूं का?

**धोला०**—कांहीं नको—समजलों मी तुझा प्रश्न! त्या प्रश्नाचें उत्तर बाबासाहेबांकडूनच मिळेल, आणि तेवढ्याकरितांच तुला त्यांचें हें निमंत्रण.

**गजेंद्र०**—पण कुठला प्रश्न समजलांत तुम्ही?

**धोला०**—तोच—तूं आपल्या कुलशीलासंबंधीं विचारणार; तोच ना?

**गजेंद्र०**—होय.

**धोला०**—चल तर मग. ( जातात )

[ दिवाणखान्यांत उदयसिंग बसला आहे असा देखावा ]

**उदय०**—ह्या पोराला माझ्या कुळाची कांहीं तरी कल्पना! फक्त सरदारी मिळाली त्या जोरावर त्यानें माझ्या मुलीची मागणी केली हॅं! आणि ती पोर देखील त्याला 'हो' म्हणते.—तिचा तरी काय दोष! त्या दोघांना एकत्र ठेविलें हीच मुळीं माझी पहिली चुकी. ( गजेंद्रसिंग आणि धोलासिंग येतात, ) गजेंद्रा, काल तूं प्रमोदिनीजवळ तुझ्या प्रेमाची गोष्ट काढलीस; परंतु तुला माझ्या कुळाची आणि योग्यतेची कांहीं तरी कल्पनारे! सांप्रत जरी मी अशा पडत्या स्थितींत आहे, तरी महाराजांच्या तोडीचें माझें फार जुनें घराणें आहे, हें लक्षांत ठेव. माझ्या प्रमोदिनीला, पती श्रीमंत

जरी मिळाला नाहीं, तरी एखाद्या गरीब पण अस्सल रजपुतालाच मी तिला देईन.

गजेंद्र०—( रागानें ) मग मी अस्सल नाहीं असें तुम्ही म्हणतां कीं काय ?

उदय०—थांब, गजेंद्रा थांब. तेवढ्याकरितांच मी तुला बोलाविलें आहे. तुझ्या विषयींची गुप्त गोष्ट आजपर्यंत मीं गुप्तच ठेविली होती, ती आतां सांगतों—बावीस वर्षांमागें, मी स्वारीहून परत येत असतां, वेशीजवळ एका मस्त हत्तीनें सोंडेंत एक टोपली आणून माझ्या घोड्यापुढें ठेवली आणि तो हत्ती जंगलाकडे उधळला. नंतर एका स्वाराकडून त्या टोपलींत काय आहे तें मीं पाहिलें. तों आंत दोन वर्षांचें एक लहान बालक, चिंध्यांत गुंडाळलेलें, आमच्या दृष्टीस पडलें. त्या बालकाच्या उजव्या हातास एक चिठ्ठी बांधलेली होती. धोलासिंग कुठें आहे ती चिठ्ठी—वाचा पाहूं ?

धोला०—(कंबरपट्ट्यांतून चिठ्ठी काढून वाचूं लागतो ) ‘ हें एक गरीब निराश्रित मूल आहे. आपण उदार, धर्मशील अहांत हें जाणून आपल्यापुढें हें मूल टाकलें आहे. आपण आपल्या मंडळीकडून ह्याला वाढवून ह्याचा जगांत कांहींतरी उपयोग करून घ्याल अशी पूर्ण उमेद आहे. जो कोणी ह्या मुलाला वाढवील त्याचें ईश्वर सदैव मंगल करो. ’

उदय०—गजेंद्रा, तें मूल अगदीं हलक्या कुळांतील असावें अशी ह्या चिठीवरून सहज तुझी कल्पना होईल—पुढें त्या मुलाची योग्य जोपासना करून त्याला आम्हीं वाढविलें, त्याच्यावर जीव कीं प्राण प्रेम केलें, त्याला योग्य शिक्षण दिलें, इतकेंहि केलें तरी तें आमच्या रक्तांत मिसळूं शकेल काय ? ( क्षणभर थांबून ) गजेंद्रा,

तेंच मूल तूं. हत्तीनें आणलें म्हणून तुझें नांव मीं गजेंद्रसिंग ठेवलें. तूं मिळाल्यानंतर चार वर्षांनीं प्रमोदिनी झाली. तिच्याबरोबर आम्हीं तुला मुलाप्रमाणें वाढविलें. मुलापेक्षां जास्त प्रेम तुजवर केलें. —परवां माझ्या शिफारशीवरून महाराजांनीं तुला एक हजार स्वारांची मनसबदारी दिली; तेवढ्यावरून, आणि आमच्या प्रेमाचा फायदा घेऊन, तूं प्रमोदिनीची मागणी केलीस हें कितीतरी अयोग्य!

**गजेंद्र०**—( दुःखाचा सुस्कारा टाकून ) बाबासाहेब, माझ्या आई-बापांविषयीं तुम्हाला कांहीं माहिती आहे काय ?

**उदय०**—नाहीं.

**गजेंद्र०**—( कपाळावर हात देऊन क्षणभर उभा राहतो. ) महाराज, आपण सांगाल तितकी कीर्ति मिळवीन; आपण सांगाल तें करीन, पण माझी प्रमोदिनीबद्दल निराशा करूं नका.

**उदय०**—हें काय भलतेंच! गजेंद्रा, मघां मी सांगितलें ना!- आतां त्या गोष्टीची जास्त वाच्यता नको. थोड्या दिवसांनीं तुझ्या योग्यतेची एखादी मुलगी पाहून मी तुझें लग्न करून—

**गजेंद्र०**—छे, छे, आतां कसलें लग्न!

**उदय०**—गजेंद्रा, असा निराश होऊं नकोस!—मी तुझा हित-कर्ता आहें हें पूर्ण लक्षांत ठेव. अद्यापि तुझें पुष्कळ वय आहे. आतां मला इतकेंच सांग कीं, ही तुझी निराशेची जखम भरून निघेपर्यंत तूं प्रमोदिनीला बिलकूल भेटणार नाहींस.

**गजेंद्र०**—( निराशेनें ) ठीक आहे महाराज.

[ गजेंद्रसिंग सचिंत बसलेला पाहून उदयसिंग धोलासिंगाला खूण करतो. दोघे जातात. ]

**गजेंद्र०**—हाय! हाय! आतां कसली कीर्ति! जिच्याकरितां

कीर्ति, मान, संपत्ति मिळविण्याकरितां धाडस करावें अशी जी माझी उत्कट इच्छा होती, ती पार जळून खाक झाली !

[ जाऊं लागतो, तों एक बैरागी प्रवेश करितो. ]

**बैरागी**—मुला, तुझें कल्याण असो. सरदार उदयसिंगाचा हाच का वाडा ?

**गजेंद्र०**—होय महाराज.

**बैरागी**—तूं कोण त्यांचा मुलगा वाटतें ?

**गजेंद्र०**—नाहीं.

**बैरागी**—मग तूं त्यांचा कोण ?

**गजेंद्र०**—कोणी नाहीं.

**बैरागी**—( चौकस दृष्टीनें पाहून ) मुला, इतक्या चौकस दृष्टीनें मी तुजकडे पाहतों, त्याबद्दल मला क्षमा कर. परंतु तुझा चेहरा माझ्या ओळखीचा दिसतो. तुझें नांव—

**गजेंद्र०**—गजेंद्रसिंग.

**बैरागी**—[ स्वगत विचार करीत ] हाच तो मुलगा. ( उघड ) पण कायरे मुला, तुझा चेहरा इतका निस्तेज आणि उतरलेला कां दिसतो ? तुझ्या सारख्या मुलावर चिंता करण्यासारखें असें संकट तरी कोणचें आलें आहे ?

**गजेंद्र०**—काय सांगूं महाराज ! आपण सर्वसंगपरित्याग केलेले, आपणाला ऐहिक सुखाची काय कल्पना !

**बैरागी**—कां असें कां म्हणतोस ? संसार असार वाटूं लागला म्हणून ही दिक्षा घेतली. मग आम्हाला ऐहिक सुखदुःखाची कल्पना कशी नसेल !—पण मुला, उदयसिंगाला वेशीवर सांपडलेला तो तूंच मुलगा ना ?

**गजेंद्र०**——होय. ( उदयसिंग येतो )

**बैरागी**——महाराजांचें कल्याण असो.

**उदय०**——आपण फार दमलेले दिसतां ? फार लांबून चालून आला वाटतं ? जा, गजेंद्रा, बुवांच्या शिधापाण्याची व्यवस्था आधीं लाव. ( गजेंद्रसिंग जातो )

**बैरागी**—होय; मी—ठाणेश्वराहून आलों.

**उदय०**—( त्याच्याकडे निरखून पहात ) प——ण——तूं कोण ? बैरागी !——नाहीं——आत्तां ओळखलें. तूं——तूं——सदयसिंग——महान् पापी——खूनी आहेस तूं ! तूंच आमच्या राजमातेचा खून केलास ! कोण आहेरे तिकडे ? पकडा या दुष्टाला——

( बैरागी पळतो, मागून उदयसिंग धांवतो )

---

## अंक ] प्रवेश ४ था. [ पहिला.

—:o:—

स्थळ:—चंपावतीचा महाल.

**चंपा०**—काय हा माझ्या लाडक्या प्रमोदिनीवर गहजब ! गजेंद्रासारखा सुस्वभावी मुलगा पाहूं गेलं तर साऱ्या त्रिभुवनांत मिळणं कठीण. पण इथल्या स्वभावापुढें कोण बोलणार ! इतक्या लहान वयांत सरदारी मिळणं ही का लहानसहानशी गोष्ट ! पण सांगावं कुणी–( दरवाजाकडे पाहून ) कोण आहे दरवाजावर ? आंत या.

( गजेंद्रसिंग येतो. )

गजेंद्रा, अरे पण हें काय? तुझे नेत्र अश्रूंनीं कां भरले आहेत ?

**गजेंद्र०**—( अश्रु पुसतो ) कांहीं नाहीं आईसाहेब; हे अश्रू

जिंकण्याचा मी प्रयत्न करीत आहें. ( क्षणभर थांबून ) मी आई-साहेबांचा आशीर्वाद मागण्याकरितां आलों आहें.

चंपा०—आशीर्वाद ! ह्मणजे तूं आह्मांला सोडून—

गजेंद्र०—जात आहें. कुठें तें मात्र मला सांगतां यायचें नाहीं, परंतु इतःपर ह्या ठिकाणीं मला राहतांच येत नाहीं—मी जात आहें; त्याचें कारण आपणांस कळलेंच असेल.

चंपा०—( हुंदके देत ) होय. ( त्याला हृदयाजवळ ओढून ) बाळा-गजेंद्रा, तुला मीं पोटच्या मुलाप्रमाणें वाढविलं ना!—नको बाळा मला सोडून जाऊं—

गजेंद्र०—हाय! हाय! मला येथें आतां जास्तवेळ राहतांच येत नाहीं—ज्यावेळेपासून मला समजूं लागलें तेव्हांपासून माझें मन सुखाची आशा करूं लागलें—आईसाहेब, आपल्या प्रमोदिनीवर मी प्रेम करूं लागलों. दिवसें दिवस तें प्रेम वाढत जाऊन शेवटीं प्रमोदिनी आपली व्हावी ही उत्कट इच्छा माझ्या मनांत उद्भवली. मी तिच्यावर जिवापलीकडे प्रेम करतों—पण आतां काय! माझ्या सुखाचा—प्रेमाचा—माझ्या जीविताचा पेला माझ्या हातून आतां सुटला—त्याच्या चिंधड्या झाल्या—माझी पूर्ण निराशा झाली. माझ्या पुरस्कर्त्या बाबासाहेबांनीं माझें प्राक्तन मला उघड करून सांगितलें. तेव्हां आतां इथें राहणें निव्वळ मूर्खपणाचें आहे. जगांत दुःखाशिवाय माझ्या वाट्याला आतां कांहींच उरलें नाहीं. ( थोडा वेळ थांबून ) माईसाहेब, जातों मी—परंतु जाण्यापूर्वीं मला आपला प्रेमाचा आशीर्वाद मिळावा. ( हुंदके देत गुढगे टेंकून बसतो. ) आपलं मजवर आईपेक्षांही जास्त प्रेम आहे, तें—तें—

**चंपा०**—( त्याला जवळ ओढून त्याच्या कपाळाचें चुंबन घेते. ) गजेंद्रा, सांग, मी तरी काय करूं? इकडे आड तिकडे विहीर—दोहों बाजूंनीं कशी कैचींत सांपडल्यासारखी झालें आहें मी. इकड्चा स्वभाव तुला पूर्णपणें माहीत आहे. माझ्यापासून होण्यासारखं असतं तर मी माझ्या बाळाला केव्हांच जन्माचं सुखी केलं असतं.

**गजेंद्र०**—आईसाहेब, तुमचें प्रेम आहे तितकें मला बस्स आहे. माझें प्राक्तन बदलावें या उद्देशानें कांहीं मी येथें आलों नाहीं. फक्त आपल्या प्रेमाचा निरोप—— ( डोळ्यांवर शेला धरितो. )

**चंपा०**—कसारे बाळ तुला निरोप देऊं!—आजपर्यंत मुलाप्रमाणें ना तुला वाढविलें!—अरेरे! बाळा, मी काय करूं म्हणजे तूं सुखी होशील?

**गजेंद्र०**—आतां सुख हा शब्द माझ्या कानीं देखील कधीं पडणार नाहीं; मग आईसाहेब, त्याची आशा तरी कां उगीच?—फक्त प्रमोदिनीला माझा निरोप सांगा म्हणजे झालें. आईसाहेब, माझ्या सर्व अपराधांची मला क्षमा करा. मी आपलें प्रेम—आपले उपकार—कधींहि विसरणार नाहीं. नेहमीं आपलें अभीष्ट चिंतीन. द्या मला आशीर्वाद. ( चंपावती डोळ्यांवर पदर घेऊन हुंदके देते. ) येतों आईसाहेब. ( जाऊं लागतो. )

**चंपा०**—( हुंदके देत देत ) थांब, थांब, गजेंद्रा थांब. बाळा, माझा एकच शब्द ऐकून जा. ( तो परत येतो. ) गजेंद्रा, आपल्या जयपूरची हद्द सोडून मात्र तूं जाऊं नकोस; आणि जिथें राहशील तिथून खासगी खबर देत जाईन असं वचन मला दे.

**गजेंद्र०**—मोठ्या आनंदानें ह्या गोष्टीचें वचन मी देतों. झालें आतां?

चंपा०—आतां मी जास्त कांहींच मागत नाहीं. जा. ईश्वर तुला सदैव सुखी ठेवो. ( त्याच्या कपाळाचें चुंबन घेते. )

( गजेंद्रसिंग पुढें जातो. पडदा पडतो. पडद्यांत 'हाय ! हाय ! गजेंद्रा ' असें शब्द एकूं येतात. इतक्यांत प्रमोदिनी प्रवेश करिते. )

प्रमो०—( गजेंद्रसिंगाच्या गळ्याला मिठी मारून हुंदके देत ) प्रेमाचा मोबदला दिल्यावांचून—तुह्मी—आतां—जातां ?

गजेंद्र०—होय. प्रमोदिनी, ही आपली शेवटची भेट ! आईसाहेबांजवळ तुला निरोप सांगितला आहे.

प्रमो०—( रडत ) पण—पण—मला भेटल्याशिवाय तुह्मी जाणार होतां ?

गजेंद्र०—होय. तुला भेटणार नाहीं, असें तुझ्या पित्याजवळ मीं वचन दिलें आहे; त्यामुळें नाइलाजास्तव तुला भेटतां येत नाहीं. पण आतां भेट झाली—मला आतां जाऊं दे. येथें जास्त वेळ राहिलों तर तुझ्या पित्याला दिलेल्या वचनाला बाध येईल.

प्रमो०—हाय ! हाय ! प्रियकरा—

गजेंद्र०—( तिला हृदयाशीं धरून तिचें चुंबन घेतो. आणि शेल्यानें तिचे नेत्र पुसतो. ) प्रमोदिनी, लाडके, मी तुझ्यावर नेहमीं प्रीति करीन. आसनीं, शयनीं चिंतनीं सर्वत्र तुझी प्रतिमा डोळ्यापुढें जागृत ठेवीन—प्रमोदिनी, कधीं कधीं ह्या गरीब गजेंद्राची आठवण करीत जा बरें !—जातों आतां. ( एकदम निघून जातो. )

प्रमो०—नाथा—थांबा—छे, गेले—पार दिसेनासे झाले—हाय हाय !

( मूर्छा येऊन पडते. )

( पडदा पडतो. )

---

## अंक ] प्रवेश ५ वा. [ पहिला.

—:०:—

**स्थळः—रस्ता.** ( रुपसीसिंग येतो. )

**रुपसी॰**—आतांपर्यंत माझें बस्तान तर ठीक बसलें! बंगालची सुभेदारी ही खात्रीनें मिळणारच—प्रयत्न केल्यावर काय होत नाहीं! परंतु त्यांत पापपुण्याचा मात्र बिलकुल विचार करतां कामा नये. मी करतों तें पाप आहे, हा विचार जर मीं केला असता तर आजवर ह्या सांप्रतच्या स्थितीला कधींच येऊन पोहोंचलों नसतों. प्रत्यक्ष महाराजांच्या शब्दापेक्षांही माझ्या शब्दाचा दरारा मीं आपल्या धूर्ततेनें सर्वत्र बसविला आहे. आजकाल माझा शब्द ह्मणजे प्रत्यक्ष महाराजांचाच शब्द, असें साऱ्या जयपुराला वाटत आहे. (कंबरपट्यांतून पत्र काढून) हें पत्र ह्मणजे माझ्या सौख्याचा कळसच होय. (पत्र उघडतो) पाहूं तर खरें, महाराजांनीं उदयसिंग सरदाराला काय लिहिलें आहे यांत—— ( वाचूं लागतो. )

" शिसोदियाकुलवंत मित्रश्रेष्ठ सरदार उदयसिंग यांस—

महानुभवि समरपटु सरदार रुपसीसिंग हे येथें किती प्रिय आहेत, हें लिहिणें नलगे. "

( स्वगत ) वा: तें काय विचारतां! [ पुढें वाचतो ]

प्रतापशाली सम्राट दिल्लीश्वर अकबर बादशहानें बंगालची सुभेदारी मला दिली आहे. हें आपणांस अवगत आहेच. परंतु माझी प्रकृति अस्वस्थ असल्यामुळें त्या सुभेदारीवर सरदार रुपसीसिंगाची नेमणूक करावी असा माझा मानस आहे. सरदार रुपसीसिंगाच्या कल्याणाची ज्याप्रमाणें मला इच्छा आहे. तद्वत् कन्या प्रमोदिनीच्याही कल्याणाची आहे. म्हणून प्रमोदिनीला ही वरयोजना करून पाठविली आहे. सरदार रुपसीसिंग हे किती साहसी चतुर आणि समरपटु आहेत त्याची साक्ष ओरिसा प्रांत काबीज करतांना,

त्या युद्धप्रसंगीं त्यांनीं केलेल्या वीरत्वजनक गोष्टी आपण विसरलां नसालच ! तेव्हां प्रमोदिनीला ही वरयोजना योग्य आहे अशी खात्री आहे. त्यांचा लवकरच विवाह करून मग बंगालच्या सुभेदारीचा उपभोग घेण्यास त्यांस पाठवावें अशी माझी फार इच्छा आहे. कळावें, बहुत काय लिहिणें—

अंबराधिपति—राजा मानसिंग.

महाराजांच्या ह्या पत्राला खात्रीनें मान मिळून ती सर्वांग-सुंदरी मला खास मिळणारच—हें सर्व माझ्या धूर्ततेचें फळ !

( जातो. )

---

## अंक ] प्रवेश ६ वा. [ पहिला.

—:०:—

### स्थळ——प्रमोदिनीचा महाल.

**प्रमो०**——( सचिंत बसली असतां ) हाय हाय ! या अभागिणीच्या नशिबाचे असे हे धिंडवडे होण्यापेक्षां जन्मतांच ह्या देहाचा अंत कां झाला नाहीं ! आमचं दोघांचं एकमेकांवर प्रेम—एकमेकांवर विश्वास कशाला जडला ? अशा स्थितींत आपल्याबरोबर दुसऱ्या-च्याहि दुःखाला कारणीभूत होण्याकरितां मी हतभागी कशाला जन्माला आलें !——नाथ ! आतां तुम्ही कुठे हो असाल ? आपली बरोबरी झाली. आपणास थोर सरदारी मिळाली—हें कळतांच तुम्हीं आपल्या निस्सिम प्रेमाची ओळख मला दिली; पण तो नुकताच वर उगवलेला प्रेमरोपा बाबांनीं निष्ठुरपणानें तोडून, आपणाला देशोधडीला किहो, लावलं ! हा दुःखजनक प्रसंग या अभागिणीच्या प्रेमामुळें आप-णावर आला ना !—आपलं मन मी ओळखीत नव्हतें असं नाहीं—आपल्या निस्सिम प्रेमाची मला कल्पना नव्हती असं नाहीं ! माझेंहि मन आपल्या प्रेमाविषयीं किती आतुर होतें म्हणून सांगूं ?

माझं मन मी उघड केलं नाहीं आणि आपण केलं, त्याचा हा शेवट! हाय! हाय! आतां मी कितीहि रडलें, ओरडलें, आक्रोश केला, विलापरवांनीं सारं जग कंपित करून सोडलं, कपाळ फोडून घेतलं किंवा छातीहि पिटून घेतली म्हणून मला माझ्या नाथांचं दर्शन होणार आहे का?—बाबा, कसेहो तुम्हीं मजवर निष्ठुर झालां? माझ्या सौख्याची अशी राखरांगोळी करावयाची होती तर मला इतक्या ममतेनं—काळजीपूर्वक लहानाची मोठी तरी कां केलीत! नका हो नका असं करूं! गजेंद्रसिंगजींच्या विरहदुःखानं माझा अंत होईल. असं नकाहो करूं!

( सचिंत बसते. मागून उदयसिंग येतो. )

**उदय०**—बाळे, किती वेळ झाला हा—जवळ जवळ मध्यान रात्र झाली, अद्यापि तूं जागीच आहेस! अशानें तुझी प्रकृति पुनः नाहीं का बिघडणार? नुकतीच कुठें हिंडूं फिरूं लागली आहेस, तों पुनः—

**प्रमो०**—पण बाबा, अशा वेळीं तुम्ही कां इथें?

**उदय०**—( थोडा विचार करून ) आज महाराजांकडून त्यांचा एक अत्यंत विश्वासू शूर सरदार आपल्या येथें राजाज्ञा घेऊन आला आहे.

**प्रमो०**—राजाज्ञा घेऊन! काय आहे ती राजाज्ञा?

**उदय०**—ती फार महत्वाची आहे—बाळे, आपल्या महाराजांचें तुजवर किती प्रेम आहे हें तुला माहीत आहेच. थोड्या दिवसांपूर्वीं महाराजांनीं तुझ्या लग्नाबद्दल मजजवळ गोष्ट काढली होती. त्या वेळीं ते ह्मणाले, ‘ उदयसिंगा, प्रमोदिनीच्या विवाहाची तूं बिलकूल काळजी करूं नकोस. ती माझीच कन्या आहे असें मी समजतों.

तिला सुखी झालेली पहावें, अशी माझी फार इच्छा आहे.' महाराजांनीं आपल्या शब्दाप्रमाणें सांप्रत सर्व व्यवस्था केली आहे. आज जो सरदार आपल्या येथें आला आहे, तो महाराजांच्या पूर्ण मर्जीतला असून थोड्याच दिवसांनीं आपले महाराज बादशहाजवळ रदबदली करून त्याला बंगालच्या सुभेदारीवर नेमणार आहेत. त्याच मोठ्या सरदाराची महाराजांनीं तुजकरितां वरयोजना करून——

**प्रमो०**——मजकरितां वरयोजना!——बाबा, हें तुम्ही मला स्वप्नांत तर नाहींना सांगत?

**उदय०**——स्वप्न असेल तर तें खरेंच असलें पाहिजे.

**प्रमो०**——नाहीं नाहीं. बाबा, तुम्ही इतके निष्ठुर होणार नाहीं.

**उदय०**——ऐक बाळे, असें वेड्यासारखें करूं नकोस! गजेंद्राच्या ठिकाणीं तुझें प्रेम जडलें आहे, हें मला माहीत आहे. परंतु तुझी योग्यता कुणीकडे आणि गजेंद्राची कुणीकडे!——तारुण्यांतील पहिल्या प्रेमाची ही गजेंद्राविषयीं आलेली लाट थोड्या दिवसांनीं तूं साफ विसरून जाशील. मग मात्र गजेंद्राच्या कुलशीलाचा विचार न केल्याबद्दल तुला पश्चात्ताप होईल.

**प्रमो०**——नाहीं. सध्या दुर्दैवामुळें हालअपेष्टांत त्यांना दिवस कंठण्याचा प्रसंग आला आहे, परंतु माझं मन मला सांगत—नाहीं—माझी पूर्ण खात्री आहे,——गजेंद्रसिंगाचा जन्म मोठ्याच कुळांत झाला आहे.

**उदय०**——( रागानें ) म्हणूनच फाटक्या रकट्यांत रस्त्यावर त्याला टाकलें होतें—असा कुलहीन गजेंद्र कुणीकडे आणि महाराजांनीं तुझ्या कल्याणाकरितां योजलेला वर कुणीकडे! प्रमोदिनी, बंगालची सुभेदारी म्हणजे तूं लहानसहानशी समजते आहेस काय?

सुखालाही तुच्छ मानून महाराजांच्या कृपाछत्राखालीं ऐश्वर्यशिखरावर वास्तव्य करणाऱ्या सरदार रूपसींसिंगाबरोबर प्रेम करावयाचें सोडून, त्या हीनकुलोत्पन्न गजेंद्राविषयींचा प्रेमाग्नि पेटवून, त्यापासून उत्पन्न झालेल्या—क्षणार्धांत होरपळून काढणाऱ्या—भयंकर ज्वालांत आपणासुद्धां आह्मां सर्वांची आहुति देऊन, जिकडे तिकडे कहर माजविण्यांत तुला काय भूषण वाटतें?—शहाणी असशील तर माझें ऐकशील. शिवाय, ही पहा राजाज्ञा—(पत्र दाखवितो.) राजाज्ञा आणि रजपुतांचा शब्द म्हणजे काय हें तुला माहीत आहे ना?

**प्रमो०**—(अस्पष्ट) हो—य. पण बाबा, नकाहो असे निष्ठुर होऊं!!! (बेशुद्ध पडते.)

[पडदा पडतो.]

[अंक पहिला समाप्त.]

# अंक दुसरा.

## प्रवेश १ ला.

—:०:—

स्थळ:—वाड्याची वेस.

( धोलासिंग आणि बैरागी प्रवेश करतात. )

**धोला०**—सहिदसिंगा, तुझ्या धाष्टर्याची जितकी प्रशंसा करावी तितकी थोडीच ! खरोखर विचारशील तर, प्रथम तूं कोणी तरी संसाराला पूर्ण वैतागून निरंतर परमेश्वरभजनांत काळ घालविणारा बैरागी असशील असेंच मला वाटलें.—खरेंच, अशा ह्या वेषांत आतां तुला कोणीं तरी ओळखूं शकेल काय ?

**बैरागी**—कां ? परवां येथील शोध करण्याकरितां आलों असतां तुझ्या धन्यानें—उदयसिंगानें—मला ' मारेकरी ' म्हणून तात्काळ ओळखलें.

( रुपसीसिंग हळूंच प्रवेश करतो. )

**रुपसी०**—( स्वगत ) हा मारेकरी–बैरागी कोण बरं ?

**धोला०**—मग ?

**बैरागी**—मग काय ! उदयसिंग सरदारानें मला ओळखतांच मी तेथून पळालों—

**धोला०**—छे: चुकी केलीस ! बाबासाहेबांनीं ओळखिलें त्याच-वेळीं त्यांना खरी हकीकत सांगितली असतीस तर—

**बैरा०**—खरी हकीकत !—छे: उलट तूंच चुकतोस. अरे, खरी हकीकत सांगण्याची अद्यापि योग्य वेळच आली नाहीं.

**रूप०**—( स्वगत ) कसली बरें हकीकत म्हणतो आहे हा ?—हा बैरागी मीं कोठें तरी पाहिला असावा असें वाटतें.

**धोला०**—मग अशी काय ती हकीकत आहे, ती मला तरी सांग!

**बैरा०**—( क्षणभर थांबून ) आपल्या निरपराधी राणीसरकारावर तो घाणेरडा दोषारोप ठेवला, ती सर्व हकीकत तुला ठाऊक आहेच.

**धोला०**—होय. आणि तुला मारेकरी नेमलें—

**बैरा०**--तेंहि तुला माहीत आहे. त्याप्रमाणें आपल्या राणीसरकारांना घेऊन मी पहाडांत जाऊं लागलों. कारण, त्यांचा वध एखाद्या भयंकर ठिकाणीं नेऊन मीं करावा, असा मला सरकारचा हुकूम मिळाला होता. मी त्यांना पहाडांत घेऊन जात असतां, त्यांची ती शोचनीय स्थिति पाहून, माझ्या मनानें उलट खाल्ली. शिवाय, माझें मन फिरण्याला दुसरींही अनेक कारणें झालीं. त्या साध्वीनें मला किती प्रकारें उपदेश केला. त्यांना मारल्यापासून मजकडून दुसरी एक हत्त्या झाली असती. कारण त्या वेळीं राणीसरकार गरोदर होत्या. स्त्रीहत्त्या आणि बालहत्त्या ह्या हत्त्या——किती भयंकर आहेत; त्याचप्रमाणें मारेकऱ्याचा धंदा—हा किती नीच आणि पापमय आहे; हत्त्येसारखीं घोर पातकें फेडण्याला किती घोर यमयातना भोगाव्या लागतात, वगैरे पुष्कळ गोष्टी त्यांनीं मला सांगून माझें दुष्ट मन वळविलें. त्यावेळीं, त्यांच्या पुढें, पुढील माझें आयुष्य सत्कृत्यांत घालवावयाचें, अशी मीं प्रतिज्ञा केली. पुढें राणीसरकारांनीं आपली सर्व दुःखकहाणी मला सांगितली. त्यावरून एका चांडाळानें तें सर्व कुभांड त्यांच्यावर द्वेषामुळें रचलें आहे, अशी माझी खात्री झाली. मग त्यांना एका सुरक्षित

ठिकाणीं ठेवून त्यांचा वध केला असें महाराजांना खोटेंच येऊन सांगितलें. पुढें पांच महिन्यांनीं त्या पुत्ररत्न प्रसवल्या. धोलासिंग, त्या वेळच्या राणीसरकारच्या शोकाची तुला कल्पना तरी होईल काय ? ज्या प्राण्याचा जन्म होतांच हत्तीवरून शर्करा वाटली जावी, त्या अभागी प्राण्याचा जन्म जंगलांत व्हावा ह्यापरतें दुर्दैव तें कोणतें ?—दोन वर्षेपर्यंत त्या दुर्दैवी मातापुत्रांचें मीं मोठ्या संकटानें रक्षण केलें. नंतर, युक्ति प्रयुक्तीनें तें मूल सरदार उदय-सिंगाच्या हातीं लागेल असें केलें.

**रुपसी**०—( स्वगत. रागानें पाय आपटून ) तोच तो गजेंद्रसिंग. आतां आलें लक्षांत !

**बैरागी**—( चपापून आजूबाजूला पाहतो. ) कोण आहे तिकडे ? —आपलें भाषण आडून कोणी तरी ऐकतो आहे असें वाटतें.

**धोला**०—( मागें पुढें पाहुन. ) थांब—मी पाहून येतों. ( रूपसीसिंग निघून जातो. ) कोणीतरी येथून गेलें हें खास !

**बैरागी**—कोण बरें तें असावें ? आपल्या शत्रूपैकीं कोणी नसला म्हणजे झालें.

**धोला**०—( क्षणभर थांबून ) मग पुढें काय झालें ?

**बैरागी**—इतका मागील प्रकार उरकून, राणीसरकारांना घेऊन मी ठाणेश्वरास निघून गेलों. त्या ठिकाणीं त्यांची नीट व्यवस्था लावून, हातून घडलेल्या पापाच्या क्षालनार्थ ह्या वेषानें तेथून मी निघालों. जवळ जवळ बावीस वर्षे निरनिराळीं तिर्थें करून परत ठाणेश्वरास गेलों. मला परत आलेला पाहून माईसरकार शोक करूं लागल्या. आपल्या मुलाला पाहण्याची त्यांना फार उत्कंठा लागली. धोलासिंग, काय सांगुं !—त्यावेळीं पुनः संकटाच्या फेऱ्यांत येऊन मी सांपडलों.

त्यांना येथें कसें आणावें, ही मला मोठी काळजी पडली. शेवटीं, अरवलीच्या पहाडांत एका सुरक्षित ठिकाणीं त्यांना आणून ठेविलें आणि राजपुत्राच्या शोधाकरितां मी एकटाच येथें निघून आलों. तों त्या दिवशीं प्रथमदर्शनींच ह्या वाड्याच्या चौकांत त्या राजबिंड्याची आणि माझी भेट! मी त्याला सर्व गोष्टी विचारणार, तों मध्येंच उदयसिंगाच्या येण्यानें मला पळावें लागलें. मी तेथून परत गेलों आणि माझ्या तोंडून 'आपला मुलगा सुरक्षित आहे' असें कळतांच, राणीसाहेबांस किती तरी आनंद झाला ह्मणून सांगूं! त्या तशाच त्याला पाहण्याकरितां मजबरोबर निघाल्या. त्यांना घेऊन मी येथें रात्रीं आलों—

**धोला०**—(आश्चर्यानें) येथें? अंबरनगरींत?—मग राणीसरकार आहेत कुठें?

**वैरागी**—ह्याच वाड्यांत.

**धोला०**—ह्या वाड्यांत? ह्या वाड्यांत त्यांचा शिरकाव झाला कसा?

**वैरागी**—कां? वाड्यांतील चोरवाटा झाडून मला माहीत आहेत. (बोट दाखवून) त्या चोरवाटेनें त्यांना गुप्तरीतीनें आंत नेलें. —गजेंद्रसिंगाला पाहण्यासाठीं त्या किती उतावीळ झाल्या आहेत ह्मणून सांगूं!

**धोला०**—पण गजेंद्रसिंग इथें आहे कुठें!

**वैरागी**—(आश्चर्यानें) ह्मणजे! गेला कुठें!

(इतक्यांत चोरदरवाजा उघडून शुभ्र वस्त्र परिधान केलेली प्रमिला येते.)

**धोला०**—(आनंदानें) राणीसरकार! राणीसरकार! अहाहा! आज किती तरी वर्षांनीं ह्या अभाग्याला हें राजमातेचें दर्शन!

( मुजरा करून ) हाय हाय ! राणीसरकार, जी आपली देदिप्यमान मूर्ति मणिरत्नमुक्तालंकारांनीं विभूषित होऊन आपल्या अतुलनीय रूपज्योतीनें ह्या अंबरनगराचा राजप्रासाद उज्वलित करून महाराजांच्या हृदयमंदिरांत आसनावर विराजमान झाली होती तीच, एका पाप्याच्या दुष्ट कुभांडामुळें, आज अलंकारविहीन आणि भगव्या वस्त्रांनीं परिवेष्टित हा अभागी दास पहात आहे. अहारे दैवा, काय तुझा हा खेळ ! ( डोळ्यावर पदर धरतो. )

**प्रमिला**—( गहिंवरून ) धोलासिंग, आतां शोक करून काय उपयोग ! अरे, हीं संकटें ह्मणजे ईश्वराच्या घरची कसोटी—माझ्या प्राक्तनांत जितकीं दुःखें आहेत तितकीं मला भोगलींच पाहिजेत.

**बैरागी**—( मध्येंच ) माईसरकार, आपण येथें आलां खरे, पण गजेंद्रसिंगाची कांहीं भेट होत नाहीं.

**प्रमिला**—म्हणजे ?

**धोला०**—कालच तो येथून एकाएकीं निघून गेला.

**प्रमिला**—गेला ! कुठें ?

**धोला०**—जयपुरास.

**प्रमिला**—कां ?

**धोला०**—काय सांगूं!—प्रमोदिनी आणि तो, लहानपणापासून एकत्र असल्यामुळें, त्यांचें एकमेकांवर प्रेम बसलें; परंतु आपण तिच्या योग्यतेचे नाहीं हें तो पूर्णपणें जाणून होता. शेवटीं परवां, त्याला सरदारी मिळाली तेव्हां, आपण उदयसिंगाच्या बरोबरीचे झालों असें वाटून, त्यानें आपल्या प्रेमाची गोष्ट तिच्या जवळ काढली. पुढें ही गोष्ट बाबासाहेबांस कळतांच, त्यांना आपल्या कुळाचा अभिमान असल्यामुळें, ‘ माझ्या प्रमोदिनीच्या प्रेमाला तूं

योग्य नाहींस ' असें त्याला सांगून, त्यांच्या प्रेमांकुराचा त्यांनीं समूळ उच्छेद केला.

**बैरागी**—अरेरे! काय वृथाभिमान हा! मानवी स्वभावाला किती नीच अहंकार वृत्तीची जोड ही!

**प्रमिला**—माझ्या गजेंद्राच्या कुलशीलाची त्यांना तरी काय कल्पना! तो कोणीतरी एक पोरका आहे असेंच ते समजत असतील.

**धोला०**—होय. शिवाय तें पत्र—त्याच्या बरोबर तें टोपलींत सांपडलेलें—त्यावरून बाबासाहेबांस तसें वाटणें अगदीं साहजिक आहे.

**बैरागी**—तें पत्र तशा तऱ्हेनें लिहिणें मला भागच पडलें. बरें मग ?

**धोला०**—प्रमोदिनीबरोबर कोठलाहि संबंध ठेवूं नये—होतां होईल तों तिच्या दृष्टीसही पडूं नये, असें जेव्हां बाबासाहेबांनीं त्याला सांगितलें, तेव्हां त्याला अतिशय दुःख झालें. शेवटीं आपण येथें राहूच नये, म्हणजे प्रमोदिनी आपल्या दृष्टीस पडणार नाहीं, असा पोक्त विचार करून काल तो येथून जयपुरास गेला.

**प्रमिला**—अरेरे! कुठल्याही संकटांना न जुमानतां माझ्या लाडक्याची भेट व्हावी म्हणून मी इथें आलें—रात्रभर त्याच्या शोधार्थ सर्व वाडाभर हिंडलें—झाडून खोलीन् खोली शोधली, पण माझा गजेंद्र मला भेटणार कुठून?—पण धोलासिंग, वाड्यांत काल दुसरा सरदार कोण आला आहे बरें?

**धोला०**—(विचार करीत) दुसरा—सरदार! होय, होय; तो रूपसींसिंग सरदार—काल महाराजांकडून कांहीं कामा—

**बैरागी**—(एकदम) रुपसीसिंग !—काय तो चांडाळ येथें आला आहे? (क्षणभर थांबून) मग तोच तर नसेल ना मघां आपलें भाषण आडून ऐकणारा ?—कोणी असो. पण माईसाहेब, तुम्ही आतां येथून चलाच. येथें आतां जास्त वेळ राहतां उपयोगी नाहीं. धोलासिंग, राणीसरकारांविषयीं तुझ्या मनांत कांहीं पूज्यबुद्धि असेल तर त्या चांडाळावर नीट नजर ठेव. तो फार भयंकर माणूस आहे. त्याची प्रत्येक हालचाल वेळोवेळीं मला एकलिंगेश्वराच्या देवळांत कळवीत जा.

**धोला०**—(हात जोडून) माईसरकार, हा देह आपल्या अन्नाचा पोसलेला आहे. आजच्या आपल्या दर्शनानें या देहाला नवा जीव आला. आजपासून त्या रूपसीसिंगावर मी करडी नजर ठेवतों; इतकेंच नव्हे—त्याची सांवलीच बनून राहतों. (जातात.)

---

## अंक ] प्रवेश २ रा [ दुसरा.

—:०:—

**स्थळ**—जयपूरचा राजवाडा.

**राजा**—बादशहाकडून पत्र आलें, रुपसीसिंग जवळ नाहीं, आणि माझी प्रकृति ही अशी, त्यामुळें मी मोठ्या चिंतेंत होतों. पण योग्य वेळीं तो तरुण सरदार जयपुरांत आला आहे अशी बातमी कळली. नाहीं तर, या क्षुल्लक स्वारीची व्यर्थ दगदग मलाच करावी लागली असती. त्या तरुण सरदाराकडून ही कामगिरी सहज होईल असें माझें मन मला सांगत आहे. त्यावें अगदीं पोरवय दिसतें तरी तो चांगलाच योद्धा आहे यांत बिलकुल शंका

नाहीं. त्याला हजार स्वारांच्या मनसबदारीचीं वस्त्रें देतांना योग्य मनुष्याला मी सरदारी देत आहें, असेंच मला त्या वेळीं वाटलें. त्या तरुण सरदाराला पाहतांच त्या वेळीं कां बरें एकाएकीं माझ्या मनांत प्रेम उत्पन्न झालें? तो जयपुरांत आला आहे, असें कळल्यापासून त्याला आपल्याजवळच ठेवावें असें मला वाटूं लागलें आहे. उदयसिंगाच्या मुलीबरोबर रुपसीसिंगाचा विवाह होऊन तो बंगालच्या सुभेदारीवर गेल्यावर ह्या तरुण सरदाराला मी आपणाजवळ ठेवणार. ( एक हुजऱ्या प्रवेश करतो. )

**हुजऱ्या**—( मुजरा करून ) सरदार गजेंद्रसिंग आले आहेत.

**राजा**—येऊं दे आंत. ( गजेंद्रसिंग येऊन त्रिवार मुजरा करून उभा राहतो. ) तरुण सरदार, ह्या वेळीं तुम्हीं जयपुरांत होतां, हें एक अती उत्तम काम झालें—आजच्या प्रसंगीं आपणासारख्या शूर सरदाराची मला फार जरूर आहे. आपलें शौर्य दाखवून कीर्ति मिळविण्याचा एक उत्तम योग सांप्रत जुळून आला आहे—आपली मर्जी आहे काय?

**गजेंद्र०**—( विनयानें ) अंबराधिपतीची आज्ञा मला सर्वथैव पूज्य आणि आदरणीय आहे. महाराजांना अशा वेळीं ह्या दासाची स्मृति झाली हें मी माझें महद्भाग्य समजतों—आज्ञा मात्र व्हावी; हा दास जीवाची किंचितहि पर्वा न करतां कोणतेंहि बिकट कार्य अंगीकृत करण्यास आज तयार आहे.

**राजा**—शाबास! शूरास साजेल असेंच तुमचें हें उत्तर आहे. वयानें जरी तुम्ही लहान आहांत, तरी तुमच्या शौर्याबद्दल तुमचा पालक उदयसिंग यानें माझी पूर्ण खात्री केली आहे. आणि तेवढ्याचकरितां हें काम इतर कोणावरहि न सोपवितां तुम्हालाच

मी सांगत आहें. तुमची कीर्ति वाढावी, तुमच्याकडून मोठमोठीं शौर्याचीं कामें व्हावींत आणि तीं पाहून माझ्या मित्राला—उदयसिंगाला—आनंद व्हावा, अशी माझी फार फार इच्छा आहे.

गजेंद्र०—महाराजांचा फक्त हुकूम होण्याचाच अवकाश—

राजा—हें पहा, दिल्लीश्वराकडून आतांच पत्र आलें आहे. जोधपूरच्या जंगलांतील पालीच्या जमिनदारानें बादशहा विरुद्ध बंड उभारलें आहे. अरवली पहाडांतील कांहीं गांव लुटून बंडवाल्यांनीं उध्वस्त केल्याची कालची खबर असून, सध्यां त्यांचा मुक्काम पहाडांत असल्याचें समजतें. माझे खास शंभर स्वार मी तुमच्याबरोबर देतों. तुम्ही जातीनें जाऊन त्यांचा मोड करावा व त्या बंडवाल्यांना आपल्या हद्दींतून कायमचे पिटाळून लावावेत.—कां ?—आपलें यावर काय म्हणणें ?

गजेंद्र०—( लवून ) महाराजांची आज्ञा मला शिरसा मान्य—

राजा—ठीक आहे तर मग. आज दिवस मावळतांच कूच करण्याचा तुम्हाला दरबारचा हुकूम आहे. ( गजेंद्रसिंग मुजरा करून जाऊं लागतो त्याला परत बोलावून ) सरदार गजेंद्रसिंग—

गजेंद्र०—(परत येऊन, मुजरा करून ) सरकार.

राजा—तुम्ही विजयी होऊन परत याल अशी माझी पूर्ण खात्री आहेच; परंतु, तुमचें अजून वय लहान असल्यामुळें तुह्माला एक अनुभवाची गोष्ट सांगतो, ती नीट लक्षांत ठेवा. कारणाशिवाय अयोग्य ठिकाणीं धाडसानें उडी टाकूं नका; आणि योग्य काळ, योग्य वेळ आल्यावर मात्र आपल्या विजयेला म्यानांत ठेवूं नका. जा—विजयी होऊन या.

गजेंद्र०—( तरवार म्यानांतून काढून ) महाराजांच्या ह्या विज-

येचा--हा प्राण गेला तरी-कधींहि अपमान होणार नाहीं. (असें म्हणून मुजरा करून जातो. राजा मानसिंगहि जाण्याकरितां उठतो, इतक्यांत रूपसीसिंग प्रवेश करतो.)

**राजा**—कां रूपसीसिंग तुम्ही इतक्यांत परत आला?—(रुपसीसिंग भुवया आकुंचित करून गजेंद्रसिंगाकडे पहांत राहतो.) तो तरुण सरदार गजेंद्रसिंग. पालीच्या बंडखोरांनीं बंड केल्यामुळें बादशहाकडून हुकूम आला आहे. त्याकरितां--

**रुपसी०**—-मग हा दास सेवेला तयार आहे.

**राजा**—-होय. पण त्यावेळीं तुम्हीं येथें होतां कोठें? मीं ही कामगिरी आतांच गजेंद्रसिंगाला सांगितली.

**रुपसी०**—-अस्सं काय?—-मग स्वारीवर निघण्याचा त्याला केव्हांचा हुकूम झाला आहे?

**राजा**—-आज अस्तमानचा.—-पण अंबरनगरींत जाऊन तुम्हीं काय केलें? उदयसिंगाला माझें पत्र दिलें का?

**रुपसी०**—-होय सरकार. महाराजांच्या पत्राप्रमाणें करण्यास सरदार उदयसिंग तयार आहेत-फक्त आपणांकडून मुहूर्ताचा दिवस कळण्याचा अवकाश!

**राजा०**—-ठीक आहे. त्याचा आपण उद्ईक विचार करूं.

(जातो.)

**रुपसी०**—-(रागानें) आजपर्यंत मी अगदीं स्वस्थ होतों. आपणाला कोणीही शत्रु उरला नाहीं असेंच मला वाटत होतें—-पण नाहीं. गजेंद्रा! स्वारीवर जाण्याचा तुला आज अस्तमानचा हुकूम झाला आहे काय? बरें आहे. तुझाच आज अस्त करून टाकतों. तूं कोण, हें अद्यापि मला माहीत नव्हतें; आणि ती-ती प्रमिलाहि

जिवंत आहे काय? पहातों आतां माझ्या तावडींतून कसे सुटतां तें! आजपर्यंत गजेंद्र ह्मणजे एक निरुपद्रवी पोरकें पोर असेंच मी समजत होतों; पण छे! तें सर्पाचें पिल्लूं उदयसिंगानें वाढविलें—माझ्या त्या भयंकर शत्रूला उदयसिंगानें प्रेमानें दूध पाजलें—शिवाय तो बैरागी—वाहवारे सहिदसिंगा! आतां बैरागी बनलास काय?—थांबा, तुमची सर्वांची वाट लावल्याशिवाय ह्या संतप्त मनाची कधींहि शांति होणार नाहीं. गजेंद्रा, माझ्या क्रोधाग्नीला आज पहिली आहुती तुझी! (रागानें जातो.)

---

## अंक ] प्रवेश ३ रा [ दुसरा.

—:०:—

**स्थळ**—अरवली पहाडाचा देखावा.

**शिपाई**—(प्रवेश करून) धन्य आहे त्या धाडसापुढें! आपला एकहि मनुष्य जाया होऊं न देतां इतक्या बंडखोरांना पकडणें म्हणजे कांहीं लहानसहानसें काम नव्हे. शाबास सरदारसाहेब, शाबास! इतक्याशा लहान वयांत आपण दाखविलेला हा पराक्रम पाहून महाराज आपणावर किती राजी होतील—प्रजाजन आपले किती धन्यवाद गातील—शाबास वीरा! तुझी ती असाधारण शक्ति, तें अलोट शौर्य, तो अतुल पराक्रम पाहून तुझ्याकरितां जीव मुठींत धरून कोण बहादूर तुझ्या बाजूस बाजू देऊन उभा रहाणार नाहीं. [ गजेंद्रसिंग येतो. ]

**गजेंद्र०**—कोण आहे तिकडे?

**शिपाई**—(मजुरा करून) हा आपला दास.

**गजेंद्र०**—जमादार, आतां रात्र फार झाली, करितां कैद्यांची

नीट व्यवस्था करून विश्रांतीचा तळ द्या. ( पडद्यांत टापांचा आवाज होतो तो ऐकून ) अशा अपरात्रीं घोडा दौडत कोण बरें येत असावें!

**शिपाई**—माझा तर्क—आपल्याच पैकीं कोणीतरी तो असावा.

( इतक्यांत एक सशस्त्र स्वार प्रवेस करून एकदम गजेंद्रसिंगावर हल्ला करतो. दोघांची चकमक झडते. जमादार भयसूचक शिंग फुंकतो. दुसरे शिपाई धांवत येतात. मधून एक तीर येऊन त्या स्वाराला लागतो. तोंच गजेंद्रसिंग त्याला वार करतो. तो पडतो. )

**गजेंद्र०**—( खालीं पडलेला तीर उचलून ) आमचें युद्ध चाललें असतां मध्येंच हा तीर कोणीं फेंकला!

( बऱ्याच वेळानें एक शिपाई पुढें होतो. )

**शिपाई**—सरदारसाहेबांनीं मला क्षमा करावी. ह्या दुष्टाचा तो वरचा कावेबाज हात पाहून ह्या दासाला वाटलें कीं, तो शत्रूचा कावेबाज हात आमच्या सरदारांना धोका देईल; म्हणून मोठ्या चपलाईनें मीं तो तीर फेंकला. परंतु महाराजांनीं त्या पूर्वींच आपलें कौशल्य दाखवून त्या दुष्टाचा तो कावेबाज हात मुळा-पासून तोडला.

**गजेंद्र०**—( किंचित् वाईट मुद्रा करून ) तूं हें वाईट काम केलेंस. त्याला आपलें शौर्यही पुरतें दाखवूं दिलें नाहींस. बरें असो—पण पोषाखावरून हा आपल्याच फौजेपैकीं दिसतो. पहा बरें, कोणीं ह्याला ओळखूं शकतो कीं काय?

( सर्वजण त्याचे कपडे तपासतात. )

**शिपाई**—हा स्वार रुपसींसिंग सरदाराच्या फौजेपैकीं आहे. मी ह्याला चांगला ओळखतों.

**गजेंद्र०**—( विचार करीत )एकूण हा आपल्याच फौजेपैकीं आहे म्हणावयाचा! मग हें असें कसें झालें? आपण कोणीतरी बंडखोरां-

पैकीं आहोंत असें वाटून त्यानें हा हल्ला केला असावा असें मला वाटतें. जा—ह्या प्रेताची नीट व्यवस्था करा.

( पडदा पडतो. )

---

## अंक ] प्रवेश ४ था. [ दुसरा.

—:o:—

स्थळ:—जयपूरची वेस.

**गजेंद्र०**—( प्रवेश करून ) स्वारीहून परत येत असतां आपण केलेल्या कामगिरीबद्दल महाराजांकडून आपल्याला केवढी शाबासकी मिळेल—महाराज किती तरी योग्यतेला आपल्याला चढवितील —वगैरे शेंकडों उत्साहजनक विचार माझ्या मनांत एकसारखे घोळत होते; परंतु आज जयपूरच्या सीमेच्या आंत पाऊल टाकतांच त्या सर्व विचारांचा एकदम अस्त झाला. महाराजांकडे जाऊंच नये असें मला आतां वाटतें! मी बंडखोरांना पकडण्याची केलेली कामगिरी पाहून महाराज खूष होतील—मला शाबासकी देतील—माझ्या शौर्याची प्रशंसा करतील—मला जहागिरी देतील, अथवा पहिल्या प्रतीच्या सरदारांत माझी गणना करतील; पण—त्या सर्वांचा मला काय उपयोग! हा एवढा मानमरातब, योग्यता, शाबासकी, सरदारी मिळवून व्यर्थ!! कोणाला आनंद वाटेल म्हणून ही कीर्ति मिळवूं? हाय हाय! प्रमोदिनीविषयीं माझे विचार, ह्या स्वारीच्या कामामुळें तरी, दडपून जातील असें मला वाटत होतें; आणि तेवढ्याचकरितां मीं ही कामगिरी पतकरली. पण छे! उलट ते विचार आतां अनावर झाले. आतां ह्या अभाग्याला त्या सर्वांगसुंदरीचें दर्शन होणार नाहीं अशी खात्री असूनहि

तिच्या दर्शनाची ही लालसा—ही आशा—मनाला सोडीत नाहीं. एक पळभर सुद्धां त्या सुंदरीची मनाला विस्मृति होत नाहीं. तिची आठवण म्यां हतभाग्यानें विसरावी म्हणून सारखा प्रयत्न करीत असतां उलट ती परमरमणीय मूर्ति प्रतिक्षणीं माझ्या दृष्टीपुढें उभी रहात आहे—हाय हाय! जें अमूल्य रत्न एकदां मला हरपलें तें कायमचें हरपलेंच! झाली!—पूर्ण—पूर्ण निराशा झाली! कोणाकरितां ही कीर्ति मिळवूं—कोणाला हें शौर्य दाखवूं! ह्यापेक्षां त्या रणमैदानांत मर्मस्थानीं एखादा घाव बसून हा प्राण निघून गेला असतां तर फार बरें होतें!—पण नाहीं! हें व्हावें कसें!! —आतां माझ्या वांट्याला दुःख—क्लेश—असह्य यातना—मर्मांतक पिडा—हृदय पिळून टाकणारी ही उद्वेगजनक स्थिति, किती—किती म्हणून सांगूं? नाहीं—नाहीं—आतां नाहीं हें सहन करवत! प्रमोदिनी! नाहीं ग आतां सहन करवत—तुझ्या विरहापेक्षां मरण पतकरलें मला!—बस्स—हेंच—हेंच चांगलें! (जंबिया काढतो) मी मेलों म्हणून कोणाला तरी वाईट वाटेल काय? कोणाला तरी दुःख होईल काय? कोणी तरी शोक करील काय? छेः—लहानपणींच मातापित्याच्या प्रेमाला आंचवलेला, उघड्यावर टाकलेला हा पोरका जीव, कुलशीलहीन हा देह ठेवून काय उपयोग! जंबिया—माझ्या प्राणाच्या मित्रा, चल ये पुढें. आतां ह्या जगांत तूंच एक माझा प्राणसखा——सर्व दुःखांचा शेवट करणारा प्राणमित्र आहेस. तुझेंच आलिंगन आतां मला अत्यंत प्रिय आहे. दुःखानें आणि निराशेनें होरपळून गेलेल्या ह्या हृदयांत खोल——खोल जाऊन तुझ्या तीक्ष्ण, शांतिदायक संगतीनें त्याची कायमची शांति होऊं दे. चल

ये——मित्रा, मला कडकडून भेट. ( जंबिया छातींत मारून घेण्याकरितां हात उगारतो. इतक्यांत मागूत बैरागी येऊन त्याचा हात धरतो. )

बैरागी——गजेंद्रा, अरे हें तूं काय आरंभलें आहेस ? आत्म-हत्या——आणि ती तुझ्यासारख्या वीरानें! छेः छेः छेः, अत्यंत——अत्यंत लाजिरवाणी गोष्ट! तुझ्यासारख्या वीराच्या मनांत हे घाणे-रडे विचार यावेत ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. परवां त्या बंडखोरांना पकडलेली हकीकत——त्या वेळीं तूं दाखविलेलें शौर्य——ऐकून मीं त्याच वेळीं शकुनगांठ मारून ठेविली आणि आज तूं हा काय विचार आरंभला आहेस ? गजेंद्रा, तुझ्या एकटयाच्या जिवावर आमची सर्व भिस्त! तूं हिंमत धरशील तर थोड्या दिव-सांत ह्या जयपुरांत आणि अंबरनगरींत विलक्षण क्रान्ति घडवून आणशील. अरे, हिंमत म्हणजे तूं काय समजला आहेस ? ह्या हिंमतीच्या जोरावर बुद्धि आणि वाचा यांच्या साहयानें आपला हा साडेतीन हातांचा सांगाडा ह्या जगांत काय करूं शकणार नाहीं! तुझी इतकी निराशा कां झाली ? तूं आपल्या देहाला इतका कां कंटाळलास ? प्रमोदिनीच्या प्राप्तीकरितां का तूं इतका निराश झालास ? पण इतकें खात्रीनें समज कीं, प्रमोदिनी ही तुझ्या-करितां आणि तूंही प्रमोदिनी करितांच. तुझ्या करितां——फक्त तुझ्याचकरितां मुद्दाम राखून ठेवलेल्या त्या सौख्य-गिरीवर पोहोंचण्याला तुला हा संकटमय, निराशयुक्त दिसणारा मार्ग धैर्यानेंच ओलांडला पाहिजे. चल उठ, असा निराश होऊं नकोस. हिंमत धर. ज्या साध्वीच्या उदरीं तूं जन्म घेतलास तिच्या दुःखाचे पांग फेडल्याशिवाय तूं मरूं इच्छितोस काय ?

**गजेंद्र**०—( विचार करून ) नाहीं—मी इतका कृतघ्न नाहीं—पण माझे आईबाप कोण हेंच जर मला माहीत नाहीं—

**बैरागी**—म्हणूनच म्हणतों, हिंमत धर. चल—आतांच चल. मातापित्याविषयीं तुझें जें आद्यकर्तव्य त्याची तुला मी आजच ओळख करून देतों.

**गजेंद्र**०—पण अद्यापि मला महाराजांना भेटायचें आहे. बंडखोरांना कैद करून आणल्यापासून अजून मी महाराजांना भेटलों नाहीं.

**बैरागी**—हरकत नाहीं. मागाहून भेटलास तरी चालेल. चल, आतां मात्र वेळ गमावूं नकोस. ( चालूं लागतात. ) गजेंद्रा, तुला ज्या ठिकाणीं मी नेणार आहें तें ठिकाण फार गुप्त आहे, आणि त्या ठिकाणाशीं तुझा अत्यंत निकट संबंध आहे. तुला वाटत असेल कीं, आपल्याला कोणी शत्रु नाहीं; परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. जरी तूं आजपर्यंत कोणाला शब्दानेंहि दुखविलें नाहींस, तरी तुला एक महाभयंकर शत्रू उत्पन्न झाला आहे. करितां, तूं फार सावध रहा. एक वेळ त्यानें तुला मारण्याचा प्रयत्न केला, परंतु तुझ्या पुण्याईनें आणि त्याच्या दुर्दैवानें त्याचा तो नीच बेत फसला.

**गजेंद्र**०—( तरवारीस हात लावून ) महाराज, जोंपर्यंत ही विजया मजपाशीं आहे तोंपर्यंत शत्रूला मी कधींही भीक घालणार नाहीं.

**बैरागी**—स्वतःच्या शौर्याची तुझी ही खात्री पाहून मला आनंदच आहे. तरींहि आपला शत्रु फार मोठा आहे हें विसरतां कामां नये.

**गजेंद्र**०—असा शत्रु तरी साधुमहाराज कोण आहे?

**बैरागी**—कळेल—थोडया वेळानें तेंहि कळेल. पण गजेंद्रा,

पाहिलेंस का? बोलतां बोलतां आपण आपल्या इच्छित स्थळीं येऊन पोहोंचलों? हा समोर दिसणारा अजमीरचा दर्गा ओलांडला कीं, आपलें इच्छित स्थळ आलें.

**गजेंद्र०**—पण महाराज, तेथें कोण आहे तें तरी मला पहिल्यानदां कळूं द्या.

**बैरागी**—तुझ्या ह्या प्रश्नाचें उत्तर तेथें गेल्यावर तुला आपोआप मिळेल.—चल ही टेकडी ओलांडली पाहिचे. जलदी कर.

[ जातात. काळ्या पोशाखाचें दोन मारेकरी प्रवेश करतात. ]

**मारेकरी १ ला**—ते पहा—ते पहा—टेकडी ओलांडून पार गेले. चल लेका, पाय उचल. तूं तर सदा रडतराऊत घोड्यावर बसलेला.

**मारे० २ रा**—चल ना—आतां घोडमैदान जवळच आहे. पण हें बघ काळ्या, तूं धर त्या छोट्या सरदाराला अन् मी धरतों बैराग्याला.

**मारे० १ ला**—कां भागुबाई भ्याली वाटतं? इनाम घेतांना लेका, दोनी हात कसे पुढें पुढें करशील.

**मारे० २ रा**—काय बोललास काळ्या! आजकाल भल्याची दुनया नाहीं. कसलेल्या जुन्या हाडाचा तो बैरागी मी धरतों म्हटलं तर मला भागुबाई म्हणतोस—धर मग लेका तूंच त्याला; अन् मी पाहून घेतों त्या कवळ्या पोराला. चल हो पुढें.

( जातात. जंगलचा देखावा. गजेंद्रसिंग आणि बैरागी प्रवेश करितात.)

**बैरागी**—गजेंद्रा, ती पाहिलीस का समोर दिसणारी झोंपडी. तेंच आपलें इच्छित स्थान. झोंपडीच्या बाह्यस्वरूपावरून तुला वाटेल कीं, आपण एका भिकारस्थळीं आलों; पण नाहीं. त्या भिकार दिसणाऱ्या झोंपडींत आपल्या जयपूरची राजलक्ष्मी साक्षात् वास

करीत आहे.--अरे पण हे दोघेजण कोणबरें असावेत? मला वाटतें, आपल्यामागें हे हेरच येताहेत.

**गजेंद्र०**—( आश्चर्यानें ) हेर! आपणांमागून हेर येण्याचें कारण?

**बैरागी**—कदाचित् खजिना घेऊन जाणारे ते जासूदहि असतील —कोणीहि असोत. आपण सावध असावें हें ठीक. ( इतक्यांत मारेकरी येऊन त्यांच्यावर एकदम हल्ला करितात. ) गजेंद्रा, सांभाळ. ( त्यांची चकमक होते. सर्वजण पडद्यांत जातात. दुसऱ्या बाजूनें शुभ्र वस्त्र परिधान केलेली प्रमिला येते. )

**प्रमिला**—( आजू बाजूला पाहून ) अशा ह्या शांत आणि एकान्त स्थळीं ही कसली बरं एकाएकीं गडबड ऐकूं आली? इथें ह्या उमटलेल्या पावलांवरून खात्रीनें जवळच कुठेंतरी चकामक झडली असावी —माझ्या शत्रूंपैकीं तर कोणी आलें नसेल ना?—देवा! किती तरी ह्या दीन अबलेचा अंत पहातोस? गेल्या जन्मीं मजकडून असं काय पातक घडलं होतं, कीं, त्याचं फळ ह्या जन्मीं मी भोगीत आहे! आतां जर माझ्यावर कांहीं संकट आलं असेल, तर हे अनंत करुणानिधे! जगत्पालका दीनदयाळा प्रभो! थोडा वेळ थांब! माझा लाडका आज येणार आहे. एक वेळ त्याला डोळे भरून मला पाहूं दे. ( पडद्यांत आवाज होतो. ) आले वाटतं—आले माझे शत्रू--

[ गडबडीनें जाते. गजेंद्रसिंग आणि बैरागी येतात. ]

**गजेंद्र०**—( हातांतील पत्राकडे पहात )महाराज त्या दिवशीं, मजवर हल्ला करणारा तो स्वार देखील रुपसीसिंग सरदाराच्याच फौजेंतील, आणि हें पत्र देखील त्यानेंच लिहिलेलें. ह्या दोन मारेकऱ्यांना पैशाची लालूच दाखवून मला ठार मारण्याकरितां त्यानें पाठविलें—पण का? रूपसीसिंगा, अरे, एका शब्दानें देखील आजप-

यंत तुला कधींहि मीं दुखावलें नसून तूं मला ठार मारण्यास उद्युक्त झाला आहेस—कां बरें ?

**बैरागी**—ऐक गजेंद्रा, आपण अगदीं आपल्या इच्छित स्थळा-जवळ आलों. तेथें पोंचण्यापूर्वीं मी जें कांहीं तुला आतां सांगतों तें नीट लक्षांत ठेव. नुकत्याच आपण अनुभवलेल्या प्रसंगाच्या गोष्टीचा त्या ठिकाणीं गेल्यावर एका शब्दानेंहि उच्चार करायचा नाहीं—काय समजलास ?—अगदीं मूग गिळून असायचें—आणि तेथून परत जयपुरास गेल्यानंतर तुला महाराजांना भेटावें लागेलच, त्या वेळीं रूपसींगच्या चिठ्ठीशिवाय करून घडलेली सर्व हकीकत बेधडक महा-राजांना सांग. रूपसीसिंगाची चिठ्ठी—त्याचप्रमाणें त्याचें नांव, तसेंच माझेंहि नांव—केव्हांहि उघड करूं नकोस. आपल्याला रूपसीसिंगाचा संशय आला आहे हें त्याला बिलकुल कळतां उप-योगीं नाहीं. नाहीं तर, वाटेल तें करून तो आपल्याला याहीपेक्षां भयंकर संकटांत घालील.

( झोंपड्याजवळ जातात. बैरागी दरवाज्यावर खूणेची टिचकी वाजवितो. थोड्या वेळानें प्रमिला प्रवेश करिते ! )

**बैरागी**—गजेंद्रा, पहा पहा, जगांतील सत्य, शुचि, पावित्र्य वगैरे सर्व गुण एकवटून ह्या देहांत मूर्तिमंत वास्तव्य करीत आहेत ! असा गोंधळून जाऊं नकोस. ही मूर्ति निव्वळ पवित्रतेची खाण—इतकेंच नव्हे—जयपूरच्या राजलक्ष्मीचें खरें खरें हें जाज्वल्य तेज या वेळीं, या ठिकाणीं पसरून राहिलें आहे !

**प्रमिला**—( गजेंद्रसिंगाला पाहून अत्यानंदानें ) अहाहा ! माझ्या लाडक्या ! माझा लाडका शेवटीं मला भेटला—बाळा—माझ्या जिव्हा-ळ्या !—इतकीं वर्षं तूं कुठे रे होतास ? ( त्याला हृदयाशीं घट्ट धरते. )

**गजेंद्र०**—( प्रेमाश्रुयुक्त तिच्या मुखाकडे टक लावून पहात ) हाय हाय! माते, आजपर्यंत तुजपासून मला कां दूर ठेवलें ? मीं असें काय पातक केलें होतें कीं, त्यामुळें माझी प्रियकर माता—माझ्या सर्व सुखाचा आगर—माझ्या अगदीं जवळ असूनहि मला अज्ञातवासांत रहावें लागलें? मी कुठें आहें हें माहीत असून देखील, माते! तूं आपल्यापासून मला कां दूर ठेविलेंस? (बैराग्याकडे वळून ) महाराज, माझ्या मातापितरांच्या अस्तित्वाबद्दल हा वेळपर्यंत कां बरें मला संशयांत ठेवलेंत आपण?

**प्रमिला**—( त्याच्या तोंडावरून हात फिरून ) माझ्या लाडक्या ! तें मात्र आमच्या हातांत नव्हतं.

**गजेंद्र०**—पण मी तुझा मुलगा हें तरी तुला माहीत होतें ना? मग असें कां केलें हें ?

**प्रमिला**—काय सांगूं!—तुझ्याच एका आशेवर, बाळा ! आज-दिन पावेतों मी जगलें बरं ! त्या दयाळू परमेश्वरानें हा सुखाचा क्षण इतक्या वर्षांनीं मला दाखविला, म्हणून त्या सर्वसाक्षी न्यायी प्रभूची मी फारफार आभारी आहें.

**गजेंद्र०**—माते, सुखाचा क्षणच कां म्हणतेस! यापुढील तुझ्या आयुष्यक्रमांत अनुपम अशा सुखाचींच स्वप्नें तुझ्या वाटयाला! मी जीवंत असतां तुला आतां दुःखाचा स्पर्श तरी होईल काय ?

**प्रमिला**—( दुःखानें ) हाय हाय ! बाळा, ती आशा आतां व्यर्थ आहे ! आज कैक वर्षांपासून मृत्यूनं आपला पाश मजवर टाकण्याची सुरवात केली आहे—त्याचं बहुतेक काम झालंही आहे. परंतु तुला एकदां डोळेभरून पाहिल्याशिवाय माझ्यानं हा जड

देह ठेववेना, तेवढ्याकरितां ह्या सहिदसिंगाची—आपल्या प्राणदात्याची—विनवणी केली; म्हणून बाळा ! आज तूं माझ्या दृष्टीस पडलास. माझी इच्छा पूर्ण झाली. मी आतां सुखानें मरेन !

**गजेंद्र०**—नाहीं, माते नाहीं—मी तुला मरूं देणार नाहीं—माझ्याकरितां तुला जगलेंच पाहिजे—माते, मजकरितां—( तिला मिठी मारतो. )

**बैरागी**—( गहिंवरून ) गजेंद्रा, असा तूं निराश होऊं नकोस.

**प्रमिला**—( कपाळावरील हात काढून ) सहिदसिंग, असाध्य वस्तूची आशा धरण्यांत आतां काय अर्थ आहे ? माझी प्राणज्योत हळू हळू विझत चालली आहे, ती तुला माहीत नाहीं का ?—देवा ! कायरे हा मजवर प्रसंग ! पण नाहीं—( गजेंद्रसिंगाला आपल्या हृदयाजवळ ओढून ) माझ्या लाडक्याकरितां मी जगणारच.

**गजेंद्र०**—( पुष्कळ वेळानें ) आई, तुझी अशी स्थिति होण्याला कारण तरी काय झालें ?

**बैरागी**—गजेंद्रा, जरा थांब—

**प्रमिला**—सांग, सांग, सहिदसिंग, त्याला जितकी गोष्ट कळली पाहिजे तितकी सांग.

**बैरागी**—( क्षणभरानें ) गजेंद्रा, तुझा जन्म होण्यापूर्वीं पांच महिने तुझ्या मातेला अनाथ आणि एकटी अशी ह्या जगांत फार क्रूरतेनें सोडली. तिच्या त्या निराश्रित स्थितींत तिला एकच मित्र होता. होय—मित्र खरा—पण तो महान पापी, अति नीच माणूस ! परंतु तिच्या सत्संगतीनें लवकरच तो निवळला. त्यानें तिचा बराच सांभाळ केला. तुझा जन्म झाल्यानंतर तिला सर्वत्र शत्रू असल्यामुळें तुम्हां दोघांना सांभाळण्याचें तर फारच अवघड झालें. नंतर,

68423

त्यानें तसाच योग जुळवून आणून तुला तुझ्या बाल्यावस्थेंत उदयसिंग सरदाराच्या स्वाधीन केलें. पुढचें सर्व तुला माहीत आहेच.

**गजेंद्र०**—आणि तो दयाळू मित्र—ज्यानें संकटसमयीं माझ्या मातेला बिनमोल सहाय्य केलें—

**बैरागी**—( मध्येंच ) तोच मी. एक यःकश्चित् माणूस ! तुझी व्यवस्था लावून आम्हीं शत्रूच्या भयानें ठाणेश्वरीं गेलों. तेथें तुझी माता ह्या वेषानें—जवळ जवळ आज बावीस वर्षें झालीं—ईश्वरचरणीं लीन होऊन, अहर्निश त्याच्याच चिंतनांत आपल्या आयुष्याचे दिवस कंठीत होती. पण अशाहि वेळीं पूर्व प्राक्तन दत्त म्हणून पुढें उभें ! एकाएकीं तिची प्रकृति बेसुमार बिघडली—त्यांत अहोरात्र तुझा सारखा निदिध्यास—तशा त्या खडतर प्रसंगीं आम्हीं उभयतांनीं गुप्तरीतीनें येथें येऊन राहणेंच मला इष्ट वाटलें. लागलींच दोघेंजण येथें निघून आलों. येथील जंगलांत राहणारे तिला ' माताजी ' म्हणतात—तिचा प्रत्येक शब्द झेलण्यास ते नेहमीं तत्पर असतात. येथें आल्यापासून आम्हाला फार सावध रीतीनें रहावें लागतें. माताजीवर केव्हां एखादें संकट उद्भवेल तें सांगतां येत नाहीं; कारण, आम्हीं आपल्या हितशत्रूंच्या अगदीं जवळपास आहोंत.

**गजेंद्र०**—( गहिंवर येऊन ) हाय ! हाय ! माते, ( तिच्या खांद्यावर मान टेकतो. ) काय हा तुजवर गहजब ! ह्यापूर्वींच जर मला हें कळतें, तर तुझ्या प्रत्येक शत्रूच्या नरडीचा मीं घोट घेतला असता. ( बैराग्याकडे वळून ) महाराज, आतां त्या चांडाळांपैकीं एका—एकाचें नांव मला सांगा, म्हणजे ह्या गजेंद्राच्या तरवारीचें पाणी त्यांना चाखवून—

**वैरागी**—थांब, असा उतावीळ होऊं नकोस. सांप्रत तुला फक्त एकच शत्रु उरला आहे. आणि तोहि तुझ्या माहितींतला असा. त्याच्या पापाचा घडा पूर्ण भरूं दे—अद्यापि तो अपुरा आहे. म्हणून म्हणतों, थांब—पण पहिल्यानें माताजीची आज्ञा घेतल्याशिवाय कांहीं एक अविचाराचें कृत्य करणार नाहींस, असें तूं प्रथम कबूल कर. कारण माताजीच्या आज्ञेशिवाय कोणतीच गोष्ट होतां उपयोगी नाहीं.

**गजेंद्र०**—मातेची आज्ञा मला शिरसावंद्य आहे. पण महाराज, माझ्या पित्याविषयीं—

**वैरागी**—( मध्येंच ) होय, तेंहि तुला लवकरच कळेल. आज कैक वर्षांनीं तुम्हां मायलेकांची सुदैवानें गांठ पडली आहे; तर पहिल्यानें तिची नीट काळजी घे, मग दुसऱ्या गोष्टी.

[ पडदा पडतो. ]

## दुसरा अंक समाप्त.



# अंक तिसरा.



## प्रवेश १ ला.

—:०:—

**स्थळ**—एका रजपुताच्या घराची पडवी.

( रजपूत आणि त्याची स्त्री प्रवेश करतात. )

**रज०**—आपल्या भाग्योदयाचा काळ आला म्हणून तर त्या बैराग्याची गांठ पडली. प्रथम त्याची गांठ पडली तेव्हां मी ही नौकरी पतकरणारच नव्हतों. पण जेव्हां त्यानें सर्व गोष्टीचा खुलासा करून सांगितला, तेव्हां मला असें झालें कीं, कधीं त्या नोकरीवर जाऊन रुजू होतो.

**रज०स्त्री**—असं काय सांगितलं त्यानं तों इकडे इतका आनंद झाला !

**रज०**—अग, तूं जर ऐकशील तर नाचायला लागशील—नाचायला ! अन् म्हणशील, 'वाः ! शाबास—भलेबहाद्दर रजपूत साहेब !'

**रज०स्त्री**—पण म्हटलं, सांगायचं तर खरं !

**रज०**—इतके दिवस तूंचना म्हणत होतीस—काम करीत नाहींत, धंदा करीत नाहींत, सारा वेळ बायकांसारखे घरांत बसून असतां—( डोळे मिचकावीत ) घे आतां, सत्रा आणे काम ! अग, ही नौकरी नव्हे; आपल्याच पायीं चालून आलेली लक्ष्मी आहे लक्ष्मी !

**रज०स्त्री**—हें काय मेलं ! सांगायच्या आधींच—

**रज०**—सांगूंच तर मग! ( शंकित मुद्रेनें इकडे तिकडे पाहून ) कान

कर इकडे. ( तिच्या कानांत कांहीं सांगतो ) काय समजलीस ? आहे कीं नाहीं ?

**रज०स्त्री**—( आश्चर्यानें ) काय म्हणतां ! आपल्या राणीसरकार त्या !

**रज०**—अग, चूप चूप. ( तिच्या तोंडावर हात देतो. ) केवढ्या मोठ्यानें बकरीसारखी ओरडलीस ही ! ( पुनः इकडे तिकडे पाहतो.) कोणी ऐकेल ! ऊं-ठ, पहा त्या बाजूला, कोणीं ऐकलें असेल. ( इकडे तिकडे पाहून ) मीं ही नोकरी पतकरली खरी, पण तुझी— ( तिच्या हनुवटीस हात लावून ) या माझ्या प्यारी दिल्फरोज, गुल् छबूची काय व्यवस्था करूं ? तुझ्या या स्वरूपामुळें, तूं एकटी असल्यावर, तुझ्यावर केव्हां काय प्रसंग येईल, सांगवत नाहीं.

**रज०स्त्री**—तर चला मला पाठीला बांधून घेऊन ! काय म्हणे हें रूप आहे. जळ्ळं मेलं तें रूप ! गावांत जशा कांहीं दुसऱ्या रूपवान् बायकाच नाहींत.

**रज०**—अग, तसें नव्हे. आज काल जग कसं फिरलं आहे !

**रज०स्त्री**—जग काय कपाळ फिरलं आहे. स्वतःचं पातिव्रत्य रक्षण करणं जिच्या तिच्या हातची गोष्ट आहे.

**रज०**—तें तर खरेंच—पण मला एक युक्ति सुचली आहे.

**रज०स्त्री**—कसली ?

**रज०**—तुझ्या सुरक्षितपणाची. आपल्या शेजारच्या एकलिंगेश्वराच्या देवळांतील, सर्वसंगपरित्याग करून ईशचिंतनांत काळ घालविणारे, आपले गुरुमहाराज, यांच्याकडे तुला नेऊन ठेवलें म्हणजे मी परत येईपर्यंत तुझ्या सुरक्षितपणाची मला काळजी नको.

**रज०स्त्री**——ठीक. ह्या निमित्तानं तरी माझा वेळ ईश्वरभजनांत जाईल.

**रज०**——तुझी मर्जी आहे तर! मग आतां वेळ कां? चल आटप, तुला त्यांच्या स्वाधीन करून आत्तांच जाऊन मी हजर होतों आपल्या नोकरीवर.

**रज०स्त्री**——चला. ( जातात )

( **देखावा**—एक लिंगेश्वराचें देवालय. रजपूत आणि त्याची स्त्री प्रवेश करितात. )

**रज०**——अशा ह्या सुरक्षित ठिकाणीं तुला ठेवल्यावर मी अगदीं निश्चित होईन. ( घांट वाजवितो. देवाला नमन करतात. वृद्ध गुरुमहाराज येतात. )

**गुरु०**——सच्चिदानन्द, (दोघे त्याला नमन करतात. ) सच्चिदानन्द, कल्याण, कल्याण. ( रज० स्त्रीकडे निरखून पाहतो. )

**रज०**——गुरुमहाराज, कांहीं विशेष कामाकरितां मी परगांवीं जात आहे. घरांत माझी ही तरुण स्त्री एकटीच असल्यामुळें मला फार काळजी पडली होती, तों मला आपली आठवण झाली. आपण म्हणजे काम, क्रोध, लोभ, मोहादि षड्रिपूंना स्ववश करून सदा सर्वदा आपला काळ ईश्वरभजनांत घालविणारे! आपल्या सारख्यांचें ठिकाण म्हणजे निव्वळ पुण्यभूमि! अशा ठिकाणीं माझी ही तरुण स्त्री राहिली तर तिच्या पातिव्रत्याची मला स्वप्नांतही काळजी करणें नलगे. आपला सहवास म्हणजे, अर्थात् ‘ समानशीले व्यसनेषु सख्यम् ’ असाच असावयाचा!

गुरु०—( डोळे मिचकावीत एकीकडे ) योग्य, योग्य. ( उघड ) कल्याण, कल्याण. ( पुनः तिजकडे निरखून पाहतो. )

रज०—मी येईपर्यंत आपण माझ्या लाडकीचा सांभाळ करावा अशी आपल्या चरणाजवळ नम्र विनंति आहे. ( स्त्रीला ) हो पुढें—गुरुमहाराजांना जाऊन नमस्कार कर. ( ती नमन करते. गुरुमहाराज, 'कल्याण कल्याण' म्हणत तिच्या कपाळावरून हात फिरवतात. ) गुरुमहाराज, माझ्या स्त्रीच्या सुरक्षीतपणाबद्दल आपण दिलेल्या ह्या अश्वासनानें मी आतां निर्भय झालों. ( स्त्रीला ) हें पहा, त्या बैराग्यासंबंधानें, तसेंच राणीसरकारसंबंधानें कोणाजवळ चकार शब्दही काढूं नकोस. मजविषयीं कोणी चौकशी केल्यास कामाकरितां मी बाहेरगांवीं गेलों आहें असें सांग. राहीलना लक्षांत! जाऊं मी आतां ? ( ती मानेनें खूण करिते ) गुरुमहाराज, घेतों रजा. ( नमन करून रजपूत जातो. )

गुरु०—कल्याण! कल्याण!! सदैव कल्याण!!! ( तो गेलासें पाहून ) मुली, ये अशी ये—अगदीं जवळ ये. हें पहा, तुझ्यासारख्या एका प्रिय भक्तिणीनें फराळाचें ताट आणलें आहे; तें आंत जाऊन तेवढें घेऊन ये पाहूं—म्हणजे आपण दोघें मिळून फराळ करूं. जा. तुला भूक लागली असेल नाहीं ?

रज० स्त्री—( जातांना स्वगत ) निर्भय स्थळ म्हणून मला इथें आणून ठेवलें, पण इथला रंग कांहीं ठीक दिसत नाहीं. देवा! असेंच कारे सर्व जग पापानें भरलें आहे ? ( जाते. )

गुरु०—काय दैवाचा विलक्षण योग तरी! ह्या बायकांनीं मला जसें अगदीं भंडावून सोडिलें आहे! कोणाच्या मनासारखें, कुणाला 'हो' ह्मणून जाब द्यावा ! उदईक या छानछबेली

खेरीज इतर स्त्रियां आयाबहिणी समजून त्या नंतरचा मग राहिलेला सर्व काळ ईश्वरा! तुझ्या—अगदीं तुझ्याच—चिंतनांत घालवीन. ( रजपूत स्त्री ताट घेऊन येते.) आलीस? ताट देखील आणलेंस? शाबास, शाबास! ये अशी. ठेव तें ताट इथें. ( ती ताट ठेवते. गुरुमहाराज ताटाजवळ बसतात. ) ये मुली, बैस; अशी लाजूं नकोस. आपल्याशिवाय येथें आतां दुसरें कोणी नाहीं, तूं आणि मी. ये अशी माझ्याजवळ बैस. ( तिचा हात धरतो. )

**रज० स्त्री**—गुरुमहाराज, फराळाचें नको आहे मला. आधीं माझा हात सोडा.

**गुरु०**—छेः छेः, असें म्हणून कसें चालेल? ये बाळे, ये अशी. ( लगट करतो. )

**रज० स्त्री**—गुरुमहाराज, सोडा मला. तुमच्या मनांत काय आहे तें मी समजलें.

**गुरु०**—( हर्षानें ) हो हो तर! मला माहित आहे तूं समजूतदार मुलगी आहेस ती. तेव्हां माझें मनोगत केव्हांच तुझ्या ध्यानांत येऊन चुकलें असेल. ( हसून ) समजलीरे समजली.

**रज० स्त्री**—( स्वगत ) आतां असें करून उपयोगी नाहीं. ह्या गधड्याचे पक्के दांत पाडले पाहिजेत. काय मेला गुरु ह्मणवितो आपल्याला. अहारे थेरड्या! ( उघड ) गुरुमहाराज, माझ्याहि—

**गुरु०**—( जास्त लगट करून ) समजलों—समजलों! मग—‘ किती तरी करूं मनधरणी, सखे तुझि’—( तिच्या सभोंवती नाचूं उडूं लागतो. )

**रज० स्त्री**—( दूर होऊन ) थांबा, अशी घाई करूं नका. उभयपक्षांचीं अंतःकरणें जिथें भिन्न नसतात तिथें मग अशा तऱ्हेचा अपमतलबीपणा कां असावा? म्हणून ह्मणतें—

गुरु०—( थोडा विरमल्यासारखा होऊन ) बरें बुवा, राहिलें आमचें आमच्यापाशीं.

रज० स्त्री—( स्वगत ) काय मेला हुरळला आहे पहा. ( उघड ) तुम्हीं किनई गुरुजी फारच उतावळे दिसतां ! घाई करून का कुठें प्रेमरस आपल्या स्वाधीन करून घेतां येतो ? मी आतां घरीं जाईन, सर्व तयारी करून ठेवीन, मग उद्यां तुम्ही असे नवाच्या सुमारास या. जातें मी.

( ती एकदम जाते. )

गुरु०—अग थांब थांब, जरा ऐकून तर जा. ( तिला जातांना पाहून ) कशी चमकली ! बाकी समजूतदार मुलगी खरी हो. म्हणे ‘ उद्यां असे नवाच्या सुमारास या.’ कांहीं घटकांचाच ना विसावा मध्यंतरी ? हरकत नाहीं. कामचेतनेची वृद्धि व्हायला तितका काळ हवाच आहे. ( मोठ्यानें हंसतो. ) आतां उद्यां ह्या अस्मादिकांना तरुण नव युवतीच्या संगमसुखाचा लाभ होणार ! कां, आहे कीं नाहीं दैव ! इतकेंहि करून शेवटीं गुरुमहाराज ते गुरुमहाराज ! ( जातो. )

---

## अंक ] प्रवेश २ रा [ तिसरा.

—:o:—

स्थळ—मानसिंगाचा दरबार.

जासूद—( प्रवेश करून ) महाराजांचा जयजयकार असो. विजयी सरदार गजेंद्रसिंग स्वारीहून परत आले आहेत.

राजा—( आश्चर्यानें ) कोण गजेंद्रसिंग ! स्वारीहून इतक्या लवकर परत आला ! येऊं द्या त्याला आंत.

**रुपसी०**—( स्वगत ) गजेंद्र अद्यापि जिवंत ! च्—च् ( पाय आपटतो ) आणि विजयी ! ( मिशांवर हात फिरवितो. )

( गजेंद्रसिंग येतो. त्रिवार मुजरा करून उभा राहतो. )

**राजा**—गजेंद्रसिंग, पालीच्या बंडखोरांची काय खबर आहे?

**गजेंद्र०**—सरकारच्या चरणाजवळ हजर आहेत.

**राजा**—काय बंडखोर हजर आहेत—जिवंत !

**गजेंद्र०**—होय सरकार. ह्या पायांची पुण्याईच तशी आहे.

**राजा**—शाबास, गजेंद्रसिंग शाबास! ( आसनावरून खालीं उतरतो. ) दिल्लीपतीच्या पत्राप्रमाणें तुम्हीं जी ही कामागिरी बजाविली त्याचा योग्य विचार उद्यां होईल. ( रुपसीसिंगाकडे वळून ) रुपसीसिंग, त्या सर्व बंडखोरांना आजच्या आज बादशहाकडे रवाना करण्याची व्यवस्था करा.

**रुपसी०**—ठीक आहे सरकार. ( मुजरा करतो. )

**गजेंद्र०**—महाराजांच्या चरणांनवळ एक फिर्याद करावयाची आहे.

**राजा**—( आश्चर्यानें ) फिर्याद !

**गजेंद्र०**—होय सरकार.

**रुपसी०**—( स्वगत ) हा कसली बरें फिर्याद करतो !

**गजेंद्र०**—सरकार, आजपावेतों कोणालाही एका शब्दानें दुखावलें नसतां, काल बटेवाच्या ओढ्यावर दोन वेळां मजवर मारेकऱ्यांनीं हल्ला केला.

**राजा**—तुमच्यावर मारेकरी—मोठें आश्चर्य आहे ! कोण मारेकरी होते ते ? त्यांच्या संबंधीं कांहीं हकीकत तुम्हांला समजली आहे काय ?

**गजेंद्र०**—नाहीं महाराज. त्यांच्या हल्ल्यांत स्वरक्षण करीत असतां ते तिघेहि मजकडून मारले गेले. त्यांचा पोशाख सर्व काळा असल्यामुळें ते मला ओळखतां आले नाहींत.

**रुपसी०**—( स्वगत ) एकूण मारेकरी कोणीं पाठविलें तें अद्यापि त्याला कळलें नाहीं, हें एका अर्थी ठीकच झालें. आतां हें काम मारेकऱ्यावर सोंपवून चालणार नाहीं. अशानें दिवसेदिवस शत्रु प्रबळ होत जाईल.

**राजा**—काय रुपसीसिंग, आपल्या छोटया सरदारानें सांगितलेल्या ह्या हकीकतविरून तुम्हाला काय वाटतें? ते मारेकरी कोणीं पाठविले असावेत ? आपल्या जयपूरच्या वेशीवर अशा रीतीनें दिवसा ढवळ्या एखाद्यावर मारेकरी चालून यावेत, ही अत्यंत लाजीरवाणी गोष्ट आहे. याचा लवकरच योग्य बंदोबस्त झाला पाहिजे.

**रुपसी०**—गजेंद्रसिंगासारख्या सरदारावर—मारेकरी ? मोठ्याच आश्चर्याची गोष्ट !—वेशीवर मारेकरी येतात तर एक विनंति आहे सरकार—मी येथें असेंपर्यंत स्वतः एक वेळ जाऊन वेशीवरील हालचाल पहावी म्हणतों, म्हणजे पाहरेकऱ्यांस, एका प्रकारची अनायासें दहशत बसून, आपल्या कामांत ते दक्ष राहतील.

**राजा**—योग्य सूचना केलीत. तुम्हीं येथें असेपर्यंत हें काम सांभाळा.

**रुपसी०**—ठीक आहे सरकार. ( स्वगत ) गजेंद्रा, सांभाळ ह्या पहाऱ्याच्या निमित्तानें आतां तुझ्यावर मला पूर्ण डोळा ठेवतां येईल. हर प्रयत्नानें एक दोन दिवसांतच माझ्या वाटेंतून तुला दूर करतों. ( उघड ) महाराज, मला वाटतें, आपल्या गजेंद्रसिंगा-

वर, बहुतकरून सूड उगविण्याच्या उद्देशानें, त्या पालीच्या बंडखोरांपैकींच कोणीं तरी, दुष्टाऱ्यानें हा हल्ला केला असावा.

**राजा**—होय. ही गोष्ट संभवनीय आहे खरी. तें काम बंडवाल्यांपैकींच कोणीं तरी केलें असावें. गजेंद्रसिंगासारख्या सरदारावर हल्ला करण्याचें लहानसहानसें धाडस नव्हे. खात्रीनें ते बंडखोरच असले पाहिजेत. हें पहा, रुपसीसिंग, पालीच्या बंडखोरांस नुकतेंच पकडलें असल्यामुळें, त्यांचे साथीदार आपल्या वेशीवर येऊन आपल्या प्रजेला त्रास देण्यास कमी करणार नाहींत. तर तुह्मांला पहाऱ्यांत असा संशय उत्पन्न करणारा कोणी आढळल्यास त्याला बिलकूल क्षमा करूं नका.

**रुपसी०**—( मुजरा करतो ) महाराजांच्या हुकमाप्रमाणें व्यवस्था करतों. ( स्वगत ) आणि मलाहीं असलाच कडक हुकूम पाहिजे होता.

**राजा**—गजेंद्रसिंग, तुम्हीं केलेल्या फिर्यादीचा लवकरच योग्य बंदोबस्त होईल. तुम्हीं आज फार दमलां अहांत; तुम्हांला रजा देतों. ( गजेंद्रसिंग मुजरा करून जातो. ) रुपसीसिंग, तुह्मी त्या बंडखोरांना बादशहाकडे रवाना करण्याची व्यवस्था करा.

**रुपसी०**—आज्ञा सरकार. ( मुजरा करतो. )

( पडदा पडतो. )

---

## अंक ] प्रवेश ३ रा. [ तिसरा.

—:०:—

**स्थळ:**—रस्ता.

**पहारेकरी**—( डुलक्या देत प्रवेश करतो. ) आजकाल बंडखोरांचें

बरेंच बंड माजलें आहे. पहाऱ्यावर असतांना बिलकूल गाफिल राहतां उपयोगीं नाहीं, असा सरदार रुपसीसिंगाचा सक्तीचा हुकूम आहे. पण काय करावें—रोजची संवय, ही झोंप कांहीं मला सोडीत नाहीं. (डुलकी देतो) ए—हुशार (पुनः नीट सावध होतो. डोळे चोळतो.) अरे हुशार म्हणून सांगितलें ना? (पुनः डुलकी देतो. रजपूत स्त्री प्रवेश करते.)

**रज० स्त्री**—सर्वसंगपरित्याग केलेला, भगवंताच्या सेवेंत आपल्या आयुष्याचा व्यय करणारा, तूं खरोखरच मोठा महात्मा असशील असें मला पहिल्यानें वाटलें; पण नाहीं, तुझी आज पूर्ण ओळख झाली. माझ्या पतीनें तुझ्यावर पूर्ण विश्वास टाकून जामदारखान्याची किल्ली तुझ्या हातीं दिली असें तुला वाटलें काय? थांब थेरड्या, तुझी धिंडका आतां दरबारापर्यंतच नेतें. (पुढें पाहून) कोण आहे? शिपाई दादा—

**पहारे०**—(खडबडून जागा होतो) आल्बेल—कोण आहे? (निरखून पाहून स्वगत) अरे, ही तर अस्मानची परी! (उघड) कोण आहे? (स्वगत) जरा दटावून तर पाहूं. (उघड) काय आहे येथें इतक्या रात्रीं तुझें काम?

**रज० स्त्री**—शिपाईदादा, दरबारांत माझी एक फिर्याद आहे.

**पहारे०**—फिर्याद आहे! दरबारांत जाण्याची ही वेळ नाहीं. तुझें काय काम असेल तें मला सांग.

**रज० स्त्री**—काय सांगूं शिपाईदादा! आमच्या घरांतल्या माणसांना काल एकाएकीं परगांवीं जावं लागलं, तेव्हां त्यांनीं मला सुरक्षित ठिकाण म्हणून एकलिंगेश्वराचे देवालयांतील गुरुमहाराजां-

च्या स्वाधीन केलं, पण दुर्दैव माझं—मला एकटीला पाहून गुरु-महाराजांची बुद्धि फिरली!

पाहारे०—हँ—हेंचना काम ! मग दरबारांत जाण्याची काय जरूरी! तो गोसावडा—आतां जाऊन त्याला लंबा करतों.

रज० स्त्री—मग तर माझ्यावर मोठे उपकार होतील.

पहारे०—त्यांत उपकार कसले ! हें तर माझें कामच आहे. पण हें पहा—त्याच्या मोबदला माझेंहि एक काम केलें पाहिजे तुला.

रज० स्त्री—( स्वगत ) अरे नशिबा ! काय खेळ हा तुझा ! एका संकटाला कसेंबसें तोंड देऊन एकदाची मोकळी झालें; पण पाहतें—इथलाही प्रकार तोच ! बरं मेल्या, तुझीहि खोडकी मोडतें. ( उघड ) काय काम आहे ?

( पहारेकरी तिच्याजवळ जाऊन कांहीं सांगतो. इतक्यांत ' हुशार ' असा पडद्यांत शब्द होतो. )

रज० स्त्री—उद्यां रात्रीं दहा वाजतां या तिकडे. जातें मी. ( एका बाजूला उभी राहते. दुसऱ्या बाजूनें जमादार येतो. )

जमा०—कोण आहे पहाऱ्यावर?

पहारे०—मी आहें जमादार.

जमा०—पहारा बराबर ?

पहारे०—बराबर जमादार. (मुजरा करतो, जमादार जाऊं लागतो, तों रजपूत स्त्री त्याच्या दृष्टीस पडते. )

जमा०—( स्वगत ) अरे, इतक्या रात्रीच्या प्रहरीं हें माषुकडें कोण इकडे ?

पहारे०—अरेरे ! पाहिली—पाहिली यानें. आतां काय करावें. आपल्याला कांहीं पचत नाहीं. ( हातानें तिला जाण्याची खूण करतो. )

जमा०—( तिच्याजवळ जाऊन ) कोण आहेस तूं ?

चांडाळांनीं माझ्या पातिव्रत्याचा भंग करण्याचा घाट घातल्यामुळें फिर्याद देण्याकरितां दरबारांत जात होतें.

**गजेंद्र०**——अरेरे, बाई, काय हा तुमच्यावर प्रसंग ! तुमच्यासारख्या निराश्रित अबलांच्या पातिव्रत्यावर हल्ला करणाऱ्यांना जिवंतच जाळलें पाहिजे. ( रागानें ) नीच नराधमांनो, हीं पातकें तुम्हीं कुठें फेडाल. बाई, तुमच्या पातिव्रत्याचा भंग करूं इच्छिणाऱ्या त्या चांडाळांचीं नांवें सांगाल तर दरबारांत जाण्याची तुम्हाला जरूर देखील नाहीं. बाई तुम्ही माझ्या धर्मभगिनी आहांत, कळूंद्या एकदां त्यांचीं नांवें कीं घेतलाच त्यांचा मीं समाचार.

**रज० स्त्री**——( स्वगत ) आहे—एकंदरीनें जगांत ईश्वर आहे ! ( उघड ) पण आपण कोण ?

**गजेंद्र०**——मला गजेंद्रसिंग म्हणतात.

**रज० स्त्री**——( आश्चर्यानें) सरदार गजेंद्रसिंग आपणच का ? मग आपणाविषयीं माझी पूज्यबुद्धि आहे. चला मी ही हकीकत सविस्तर आपणाला सांगतें. ( जातात. )

---

## अंक ] प्रवेश ४ रा. [ तिसरा.

—:०:—

**स्थळ:**——अरवलीच्या पहाडांतील झोंपडी.

**जंगल्या**——( प्रवेश करून )त्या बाईला—बिचारी कोणाच्या अध्यांत ना मध्यांत! एकटीच ह्या पहाडांत येऊन राहिलेली—तिला ठार मारण्याचा ह्या रुपसीसिंगाचा काय बरें उद्देश असावा? आज इतके दिवस झाले, हा एकसारखी ह्या बाईची चौकशी करतो, तर अशी ही बाई तरी कोण असावी बरें? कांहीं तरी येथें गडबड आहे

खास. कारण ह्या बाईला ठार मारण्याच्या क्षुल्लक कामाकरितां मला पांचशें मोहरा देण्याचें त्यानें कबूल केलें आहे. यावरून ती बाई कोणीतरी थोरामोठ्याची असली पाहिजे. असेना—आपल्याला काय करावयाचें आहे! अरे—हेंच तें झोंपडें. इतक्या लवकर मी येथें आलों हं!

( प्रमिला संतिणीच्या वेशानें येते. )

**प्रमिला**—'मी एक विश्वासू नोकर पहारा करण्याकरितां पाठवून देतो ' असें त्या दिवशीं सहिद्‌सिंग म्हणाला. पण अद्यापि त्याचा पत्ताहि नाहीं. शिवाय दोन दिवस माझ्या लाडक्याचीही खबर मला कळली नाहीं. अरे, पण हा कोण? हाच तर तो मनुष्य नसेल ना?

**जंगल्या**—होय मीच तो. ( एकदम उडी मारून तिच्याजवळ जातो. आणि जंबिया बाहेर काढतो. ती भयभीत होऊन किंकाळी फोडते. ) हें पहा, ओरडण्याचें कारण नाहीं. तूं जर पुरुष असतीस तर, क्षणाचाहि विलंब न करतां, हा जंबिया तुझ्या छातींत भोंसकला असतां; पण तूं आहेस बायको मनुष्य—म्हणून ईश्वरस्मरण करण्यापुरता तुला वेळ देतों. हँ—आटप.

**प्रमिला**—देवा! बावीस वर्षांपूर्वीं नेमलेला हा दिवस आज उगवला ना! नुकतीच कुठें तूं मला सुखाची आशा लाविली होतीस, आणि इतक्यांतच कां असा कठोर झालास? माझी अशी शेवटीं निराशा करावयाची होती, मग हीं बावीस वर्षं तरी कां मला व्यर्थ जगविलंस! असो, तुझी मर्जी. चल बाबा आटप! तुला कुणीहि पाठविलेलं असो, तूं आपलं काम कर. ईश्वर तुझं कल्याण करो. ( कफनी काढते ) आटप बाबा.

**जंगल्या**—( भयभीत होऊन ) को—ण राणीसरकार ! ( त्याच्या हातांतून जंबिया खालीं पडतो व तो थरथर कांपतो. )

**प्रमिला**—होय बाबा, मीच ती दुर्दैवी राणी! आटप, तूं कां थांबलास ?

**जंगल्या**—( तिच्या पायावर डोकें ठेवून ) नाहीं, नाहीं; माझे मायबाप सरकार, आपल्या केंसालाही आतां धक्का नाहीं.

**प्रमिला**—ऊठ बाबा, ऊठ.

**जंगल्या**—नाहीं. ह्या पापी चांडाळाला अभय मिळाल्याशिवाय नाहीं.

**प्रमिला**—ऊठ. तो दयाळू ईश्वर तुला क्षमा करील. ऊठ.

**जंगल्या**—( उठतो ) राणीसरकार, आपला शत्रु कोण हें आतां माझ्या चांगलें लक्षांत आलें.—सरकार, या दासाचें इतकेंच सांगणें आहे, आपण या उपर येथें बिलकुल राहूं नये. शत्रूला आपली चाहूल लागली आहे. केव्हां काय प्रसंग येईल तो सांगतां येत नाहीं. त्या दिवशीं एक बैरागी आणि गजेंद्रसिंग सरदार येथें आले होते; ते आपले सहाय्यकर्ते आहेत काय ?

**प्रमिला**—होय—गजेंद्रसिंग हा माझा मुलगा—

**जंगल्या**—( मध्येंच आश्चर्यानें ) गजेंद्रसिंग आपला मुलगा ! ( एकदम जाऊं लागतो ) मग मला जाऊं द्या. तो चांडाळ त्याच्यावरहि काय संकट आणील त्याची कल्पना करवत नाहीं—मी जातों—तुम्हीं मात्र येथून लवकरच पळून जा कशा.

( जातो. )

**प्रमिला**—काय हें संकट ! माझ्या लाडक्याच्या जिवाला कांहीं अपाय होण्याऐवजीं, देवा ! मला अभागिनीलाच मरण दे. आतां

मी काय करूं ! मी आतां कुठें जाऊं !—खास, ह्या विचारांनीं आतां मी वेडी होणार—हे दीनदयाळा प्रभो ! कां माझा आतां अंत पाहतोस ! हे आई धरणीमाते ! तूं तरी आम्हाला आपल्या पोटांत घे. ( जाते. )

---

## अंक] प्रवेश ५ वा. [ तिसरा.

—:०:—

**स्थळ**—रुपसीसिंगाचा वाडा.

**रुपसी०**—( अस्वस्थतेनें इकडे तिकडे फिरतो ) काय करावें ! हा जंगल्या अद्यापि येत नाहीं. वास्तविक त्यानें इतक्यांत यायला पाहिजे होतें. आणखी थोडा वेळ त्याची वाट पाहून मग जावें. काल त्या सुंदरीला पाहिल्यापासून माझ्या मनाला सारखी तळमळ लागली आहे. अहाहा ! काय तें स्वरूप—भाषण तरी किती मोहक ! ‘ सरदार साहेब, आपला आश्रय असल्यावर मला जास्त तें काय हवं आहे ? ’ हें तिनें उच्चारलेलें वाक्य अद्यापि माझ्या कानांत गुणगुणत आहे ! ( खाडकन् भुयाराचा चोर दरवाजा उघडतो आणि जंगल्या वर येतो. ) जंगल्या, मूर्खा किती वेळ केलास हा ?

**जंगल्या**—वेळ ! लवकर आलों हेच उपकार समजा.

**रुपसी०**—( रागानें ) जंगल्या, जरा शुद्धीवर येऊन आदबीनें बोल. तूं कोणाबरोबर बोलतो आहेस याची तुला कांहीं कल्पना ?

**जंगल्या**—बरोबर कल्पना आहे म्हणूनच बोलतों. तुम्हीं नका त्याची काळजी करूं सरदारसाहेब. आमच्यासारख्याबरोबर व्यवहार करणारी मंडळी किती अदबीची आणि तोलाची—याची आह्माला फार चांगली माहिती असते. पण जाऊं द्या तें आतां. तुह्मी ज्या

कामाकरितां मला पाठविलें होतें तें काम मीं साफ केलें नाहीं---माझ्या या पापी हाताकडून झालें नाहीं.

रुपसी०---म्हणजे !--त्या बाईला तूं मारलें नाहींस--

जंगल्या---नाहीं.

रुपसी०---कां ? तूं वचन दिलें होतेंस ना ?

जंगल्या---नाहीं. रुपसीसिंग, केव्हांही मीं आपल्याला वचन दिलेलें नाहीं; आणि यदाकदाचित् तें दिलें असतें, तरी देखील त्या बाईला मीं ईश्वराला स्मरून सांगतों, कधींहीं मारलें नसतें.

रुपसी०---अरे चोरा ! आतां आलें लक्षांत. माझ्याकडून जास्त मोहरा उपटण्याचा तुझा हा अंतस्थ हेतू दिसतो आहे. पण लक्षांत ठेव---

जंगल्या---तुह्मीं माझ्यापुढें लाख मोहरा जरी आणून मोजल्यात तरी त्या दीन अनाथ गायीवर मी आपलें शस्त्र उचलणार नाहीं.

रुपसी०---कां, कां नाहीं ?

जंगल्या---सांगतों ऐका--( क्षणभर थांबून ) मी माझ्या आईचा एकुलता एक. तिचें मजवर फार प्रेम--

रुपसी०---असेल--पण ती स्त्री कांहीं तुझी आई नव्हे. तिला कां नाहीं मारलेंस तें सांग ?

जंगल्या---तेंहि नंतर सांगतों---माझ्या आईनें कशीबशी आम्हां उभयतांच्या निर्वाहाची सोय करून मला त्यांतल्या त्यांत थोडी विद्याहि शिकविली. पहिल्यानें मी शेतकीचा धंदा करीत असें. पुढें मला वाईट संगत लागून मी लहानसहान चोऱ्या करूं लागलों. त्याहि अंगवळणीं पडतांच, त्या आम्हांला कमी दर्ज्याच्या

वाटून, माझ्या जीव कीं प्राण दोस्तांनीं नंतर उघड उघड बंड केलें; परंतु राजा तोडरमल्लानें तें बंड ताबडतोब मोडलें. त्या वेळीं कांहीं सोबत्यांना मीं माझ्या घरीं छपवून ठेविलें होतें. ही गोष्ट राजा तोडरमल्लाला कळतांच त्यानें आम्हां सर्वांना—माझ्या आईला सुद्धां—कैद केलें.

**रुपसी०**—(रागानें) मसणांत गेली तुझी ती आई आणि तिच्या-बरोबर तूंहि !

**जंगल्या**—(रागानें डोळे लाल करून हाताची मूठ उगारतो) हूँ—तोंड संभाळून बोल. माझ्या आईच्या नांवाचा उच्चार केलास तर याद राखून रहा.

**रुपसी०**—(थोडा नरम पडून) अरे जंगल्या, असें पहा, त्या गोष्टी मला आतां सांगून काय करणार ? झाली—गेली—होऊन गेली ती गोष्ट. आतां काय राहिलें आहे त्याचें !—आतां मीं विचा-रलेल्या माझ्या प्रश्नाचें सरळ उत्तर दे. दुसरी भाकडकथा नको आहे.

**जंगल्या**—मग मुकाट्यानें ऐक.—बंडखोरांना सुळावरची शिक्षा ठरली असल्यामुळें आम्हालाही पण तीच शिक्षा झाली. त्या वेळीं माझ्या आईनें फार शोक केला. हें सर्व राजवाड्यांतून एक बाई पहात होती. तिला आमची करुणा येऊन तिनें राजा तोडरमल्लाला आमच्याजवळ पाठवून, स्वतः ती मेण्यांत बसून आमच्याजवळ आली. आणि आमच्याबद्दल रदबदली करून राजा तोडरमल्लाला ती म्हणाली, ‘ भावोजी, हे दोघे मातापुत्र निरपराधी आहेत अशी माझी खात्री आहे. यांना सोडून द्या. ’ आणि मला पुष्कळ उप-देश करून म्हणाली, ‘ मुला, तूं ही वाईट संगत आजपासून सोडून दे. त्यांत तुझें कल्याण आहे. ’—हाय हाय ! तिचा उपदेश जर

मीं ऐकला असतां तर आपल्या सारख्याकडे येण्याची आज मला गरजच पडली नसती.

**रुपसी०**—(रागानें दांत चावून) पण त्या बाईचा येथें काय संबंध ?

**जंगल्या**—काय संबंध ! फार निकटचा संबंध आहे.

**रुपसी०**—म्हणजे ! त्याच बाईला आज तूं मारण्याकरितां गेला होतास ?

**जंगल्या**—होय. त्याच–त्याच माझ्या मातृस्थानीं ठरलेल्या महापुण्यशीलेला.

**रुपसी०**—मग ती बाई कोण हें तुला माहीत आहे तर!

**जंगल्या**—होय. त्या बाईसंबंधानें मला सर्व माहीत आहे.

**रुपसी०**—(एकदम त्याचा गळा दाबून तरवार उपसतो.) तिच्याविषयीं तुला जास्त माहिती असणें बिलकूल उपयोगी नाहीं. थोड्याशाच माहितीचा कां होईना–सांठा ज्यांत, त्या तुझ्या हृदयाचींच आधीं दोन शकलें करून टाकतों. (जंगल्या हिसका मारून त्याच्या हातांतील तरवार घेतो आणि त्याला खालीं पाडून त्याच्या छातीवर बसतो.)

**जंगल्या**—आतां कुठें जाशील? आली तुझी सर्व शेंडी माझ्या हातांत. त्या साध्वीच्या केंसाला धक्का लागणार नाहीं असें वचन देशील तर जिवंत सोडतों; नाहीं तर मेलास म्हणून समज. (त्याचा गळा दाबतो.)

**रुपसी०**—(कासावीस होऊन). दे–दे–देतो–देतों–प–पण ती बाई कोण त्याविषयीं तूंहि कोणाला सांगणार नाहीं असें मला व–व–व–चन दे.

**जंगल्या**—ठीक आहे. हें घे वचन. (त्याला सोडतो. एक मेक

वचन देतात. जंगल्या त्याच्याकडे क्रूर मुद्रेनें पहातो. ) पण लक्षांत ठेव. वचन दिलें आहेस; नाहींपेक्षां जंगल्याबरोबर गांठ आहे.

( जातो. )

**रुपसी०**——(कांहीं वेळ चिंताक्रांत बसतो) बाकी हें काम कांहीं ठीक झालें नाहीं. एकामागून एक नवीन शत्रु उत्पन्न होऊं लागले. हा जंगल्या आपलें काम करील अशी मला खात्री होती, पण उलट तोच माझा शत्रु बनला. आतां असें करून उपयोगीं नाहीं. हें काम स्वतःच हातीं घेतलें पाहिजे. ( इकडे तिकडे फिरतो ) अरे, पण ती सुंदरी वाट पहात असेल——तिकडेच जावें आतां. म्हणजे भडकलेल्या मनाला किंचित् समाधान वाटेल.

( जातो. )

---

## अंक ] प्रवेश ६ वा. [ तिसरा.

—:०:—

स्थळः—रजपूतांचें घर.

**रज० स्त्री**——आज इथें आबुकमाबुकांचा बाजार भरणार आहे. ह्या मेल्यांना घरीं बायका नाहींत का? हे नरपशु ह्मणजे आपल्या स्त्रियांना पदोपदीं छळणारे, बाहेर शेण खाण्याच्या आपल्या पापी—निंद्य वर्तनानं त्यांना झुरणीस लावून मारणारे, व्यसनी, पापी नवरे होत. यांच्याहीपेक्षां नीच म्हणजे टिळामाळा करून अंगांत कफनी घालून तोंडांत राम आणि बगलेंत कामाची सुरी घेऊन फिरणारे हे गुरुमहाराज होत. माझ्या भगिनींनो, अशा ह्या उडाणटप्पूंपासून तसेंच साधुवृत्ति धरणाऱ्या ह्या भोंदूंपासून तुम्ही फार सावध रहा. ( दरवाजा वाजतो ) आलं आमच्या पतींच्या विश्वासाचं कूळ, गुरुमहाराज आले. या——

( दरवाजा उघडते, गुरुमहाराज येतात. )

गुरु०—( इकडे तिकडे पाहून ) शाबास, शाबास. तुझ्या सारखी आज्ञाधारक तूंच. आतां तो दरवाजा लाव पाहूं. ( ती दरवाजा बंद करते. ) कालपासून हावेळ पावेतों इतका वेळ मीं कसा कंठला याची तुला कांहीं कल्पना आहे का? ये अशी. आतां लाजूं नकोस.

रज०स्त्री—गुरु महाराज, तुम्हीं आलां म्हणून मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं!

गुरु०—आनंद झाला ना! व्हावयाचाच. ये तर अशी जवळ.

रज०स्त्री—हें पहा, गुरुमहाराज, मी किनई तुमच्याकरितां हें उत्तम फराळाचं केलं आहे. तेवढं घेऊन—

गुरु०—छेः, छेः, आतां फराळाचें राहूं दे बाजूला. आधीं माझ्या अगदीं जवळ ये अशी. ( ती फराळाचें ताट आणते आणि गुरु महाराजांना हात धरून बसविते. इतक्यांत दरवाजा वाजतो. ) को—को—कोण आलें? फा—फा—फा—

रज० स्त्री—असे भिऊं नका गुरुमहाराज. मी पाहतें कोण आलं तें. तुमचं आपलं निमुटपणं चालूं द्या फराळाचं. ( मोठ्यानें ) कोण आहे बाहेर?

( पडद्यांत 'मी शिपाई' असा शब्द होतो. )

गुरु०—( भयभीत होऊन ) को—को—कोण—? शिपाई! अब्—ब्—ब्!! ( हातपाय लटलट कांपूं लागतात. ) आतां काय करूं? ( पडद्यांत 'दरवाजा उघड' असा पुनः शब्द होतो. ) अब्—ब्—ब्! आला, आला, शिपाई आला!

रज० स्त्री—अरे मेल्या, गुरु ह्मणवितोस काय! थांब, आतां—

गुरु०—(हताश होऊन) अग माझे आई! मला कुठें तरी पळव! (पुनः दरवाजा वाजतो.) अर–र–र—आला–देवी—माते, पायां पडतों—(तिला साष्टांग नमस्कार घालतो. ती त्याला लपविते आणि दरवाजा उघडते. शिपाई येतो. पुनः ती दरवाजा बंद करिते.)

शिपाई—(इकडे तिकडे पाहून) तूं तर सर्व तयारी करून ठेविली आहेस! (तिचा हात धरूं लागतो.) असें काय बरें! जवळ येना ?

रज० स्त्री—हा पहिल्यानें फराळ तर करा, मग आहेच मी.

शिपाई—बरं. (बसतो. थोड्या वेळानें दरवाजा वाजतो.)

रज० स्त्री—(मुद्दाम मोठ्यानें) कोण आहे—?

(पडद्यांत 'मी जमादार' असा आवाज होतो.)

शिपाई—कोण जमादार! (ताटावरून ताडकन् उठतो.) अग रांडे, घात केलास माझा. (तिला मारण्याकरितां धांवतो.)

रज० स्त्री—गप्प—ऐक. गडबड करशील तर दरवाजा उघडीन.

(दरवाजा उघडण्याकरितां जाऊं लागते.)

शिपाई—(तिला अडवून) अग थांब, पहिल्यानें मला जाऊं दे मग—(त्याला लपविते आणि दरवाजा उघडते. जमादार येतो.)

जमा०—(इकडे तिकडे पाहून) तूं तर अगदीं माझी वाट पहात राहिली असशील ना ?

रज० स्त्री—हें काय विचारायचें! ही सर्व तयारी करून मी केव्हांची आपली वाट पहात आहें. (दरवाजा बंद करतें.)

शिपाई—(लपलेल्या जागेवरून) होय, होय तर! तयारी म्हणजे किती ? ह्या दुसऱ्या कोपऱ्यांत तयारी करून ठेविली आहे ही.

जमा०—बरं तर आतां उशीर कां ?—फराळ करूं म्हणतेस ?

(बसतो. क्षणभरानें दरवाजा वाजतो.)

**रज० स्त्री**—दार कोण ठोठावतं आहे तें ?

( पडद्यांतून सरदार रुपसीसिंगाचा आवाज ऐकूं येतो. )

**जमा०**—( ताटावरून उठून ) कोण सरदार रुपसीसिंग वाटतें ! येथें कशाला आले ?

**रज० स्त्री**—मला काय माहीत ! आले असतील आपल्याला शोधायला.

**जमा०**—आतां काय करावें !

**शिपाई**—( लपलेल्या जाग्यावरून हळूंच ) रडावें.

( क्षणभरानें रजपूतस्त्री जमादाराला लपविते आणि दरवाजा उघडते. सरदार रुपसीसिंग येतो. )

**रुपसी०**—सुंदरी, तूं माझी सारखी मार्गप्रतिक्षा करीत असशील, पण काय करूं ? आम्हां सरदारांना म्हणजे हजारों कामें.

**शिपाई**—( हळूच ) हीं कामें पहा.

**रुपसी०**—पण हें काय ? हें ताट कसलें ? काय करावें बुवा तुला ! ( तिच्या हनुवटीला हात लावतो. ) ही इतकी मेहनत करण्याची काय जरूर होती ?

**रज० स्त्री**—आपल्यासारख्या सरदारांचे पाय येथें तरी कधीं लागणार होते ? बसाना आतां फराळाला !

( हात चढवून बसतो, इतक्यांत त्वेषानें गजेंद्रसिंग येतो. )

**गजेंद्र०**—अहारे नीचा, पातक्या ! हाच का तुझा रात्रीचा पहारा चालला आहे ? अनाथांचें रक्षण करण्याचें काम तूं फार चांगलें करतोस !

( लपलेल्या प्रत्येकाच्या कमरेंत लाथा मारतो. तसा आरडत ओरडत एक एक जण बाहेर पडतो व सर्व पळतात. रुपसीसिंगाची आणि गजेंद्रसिंगाची चकमक होते. पडदा पडतो. )

**तिसरा अंक समाप्त.**

# अंक चौथा.



## प्रवेश १ ला.

—:०:—

स्थळ:—जयपूरची वेस.

**रुपसी०**—( प्रवेश करून ) त्या दिवशीं प्रमिला जिवंत आहे असें कळलें, तेव्हांच पूर्वीं केलेल्या हलगर्जीपणाचा मला पश्चात्ताप झाला. पूर्वीपासून नीट सावधगिरी ठेविली नाहीं त्याचाच हा परिणाम !—माझ्या म्हणण्याला राजी झाली नाहींस म्हणून, प्रमिले ! तुझ्या सर्व सौख्याची माती करण्याची मीं प्रतिज्ञा केली. त्या अक्कलशून्य मानसिंगाच्या मनावर आपल्या कर्तृत्वानें पूर्ण पगडा बसवून तुझ्याविषयीं त्यांच्या मनांत जबरदस्त विकल्प उत्पन्न केला. इतकेंहि करून माझ्या मनाची शांति होईना; म्हणून, माझ्या सौख्याला खग्रास लावणाऱ्या मानसिंगाच्या—प्रत्यक्ष तुझ्या पतीच्याचकडून तुला मारेकऱ्याच्या हातीं दिलें. त्या वेळीं, प्रतिज्ञा पूर्ण झाली असें वाटून, मला किती तरी आनंद झाला होता ! त्या आनंदाचे भरांत तुझी चौकशी केली नाहीं, त्या मूर्खपणाचें फळ, आज तीन शत्रू मीं उत्पन्न करून घेतले. इतकें झालें तरी मी आपला स्वस्थच ! स्वतः शत्रूचा सूड उगविण्याचें सोडून मूर्खासारखें तें काम मारेकऱ्यांच्या हातीं दिलें, आणि लागलों प्रेमासाठीं त्या प्रमोदिनच्या मागें—किती मूर्ख मी ! ‘ स्वतः मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं ’ हें अगदीं अक्षरशः खरें आहे. दुसऱ्यावर भिस्त ठेवून आपला कार्यभाग होईल म्हणून स्वस्थ राहिलों परंतु उलट शत्रू मात्र

सावध केले. आतां हेंच पहा—स्वतः हें काम हातीं घेतांच पहिल्या तडाख्याला बैरागी तर लोळवलाच ! आतां ती प्रमिला आणि तिचा तो कारटा !—गजेंद्रा, आजपर्यंत तूं माझा गुप्त शत्रु होतास तो काल माझ्या ऐन सुखाच्या वेळीं येऊन स्वखुशीनें चालत आलेल्या त्या सुंदरीपासून प्राप्त होणाऱ्या सौख्याचा भंग करून माझा उघड शत्रु झालास. पण आतां सांभाळ—नांवाचा रुपसीसिंग असेन तर आजच्या रात्रींत सारें जयपूर पालथें घालून तुला हुडकून काढीन. (जातो.)

(गजेंद्रसिंग प्रवेश करतो.)

**गजेंद्र०**—कोण बरें माझा तो हितकर्ता असावा ! वेषावरून तो खात्रीनें कोणी तरी वाटमाऱ्या असला पाहिजे ! पण माझ्या मातेविषयीं त्याला काय माहिती ? मीच तिचा मुलगा असें त्यानें कशावरून जाणलें असावें ? आमची त्याला चांगली माहिती असल्याशिवाय ' शत्रूला चाहुल लागली, सावध रहा, आपल्या मातेला सांभाळ. प्रत्येक क्षण लाखाचा जातो. ' इतकें बजावून कोण बरें सांगणार ? ह्या वेळीं दुःखानें गांजलेल्या माझ्या प्रियकर मातेवर कांहीं संकट तर आलें नसेल ना ?—होय, खातीनें असाच कांहीं तरी प्रकार असला पाहिजे.

(जातो. दुसऱ्या बाजूनें रूपसीसिंग प्रवेश करतो.)

**रुपसी०**—खात्रीनें येथून कोणीतरी घाईघाईनें निघून गेला. अशा अपरात्रीं वेशीवरून जाणारा कोण बरें असावा तो ? ह्याची शहानिशा झालीच पाहिजे. (मोठ्यानें) कोण आहे तिकडे ? (पडघांत ' मी ' असा ध्वनि होतो.) मी ! मी कोण ?

**गजेंद्र०**—(प्रवेश करून) मी गजेंद्रसिंग.

**रुपसी०**—कोण गजेंद्रसिंग? इतक्या रात्रीं कोठें चाललास तूं?

**गजेंद्र०**—त्याच्याशीं तुला काय करायचें आहे?

**रुपसी०**—( रागानें ) काय करायचें आहे! अशा रात्रीं तुझ्या-सारख्यानें फिरणें हेंच संशय घेण्याला पुरेसें कारण आहे. अशा अपरात्रीं कांहींतरी पापकर्म करण्याच्या उद्देशानें तूं—

**गजेंद्र०**—पापकर्म! रुपसीसिंगा, तूंच कालच्या आपल्या स्वतःच्या वर्तनावर जरा लक्ष दे.

**रुपसी०**—काय! तूं मला चिडवूं पहातोस? गजेंद्रसिंगा, लक्षांत ठेव—महाराजांच्या आज्ञेवरून मी वेशी तपासण्याकरितां निघालों आहें. माझा अधिकार लक्षांत आणून मीं विचारलेल्या प्रश्नाचे मुकाट्यानें सरळ उत्तर दे.

**गजेंद्र०**—वेशी तपासण्याचें काम तूं किती नेकीनें करतो आहेस त्याचा अनुभव मला काल आलाच आहे. नीचा! स्त्रियां-च्या पातिव्रत्यावर—

**रुपसी०**—( तरवार उपसून ) हं सांभाळ. मला चिडविल्याबद्दल हें घे बक्षीस. ( दोघांची झटापट होते. रुपसीसिंग खालीं पडतो. त्याची तरवार मोडते. )

**गजेंद्र०**—( तिरस्कारानें ) निःशस्त्र झालास म्हणून सुटलास. जा पाप्या, मुकाट्यानें जा. नीचा अद्यापि आपलें वर्तन सुधार.

( जातो. )

**रुपसी०**—( उठून ) ऐन वेळेवर ह्या तरवारीनें माझा घात केला. चांडाळा! ह्या वेळीं तूं माझ्या पूर्ण तडाक्यांत सांपडला होतास; पण ह्या तरवारीनें ( तरवार फेंकून देतो ) ऐन वेळीं माझा डाव फसला! आतांच्या आतां दुसरें शस्त्र मिळवून तुला गांठलेंच

पाहिजे. सर्पाच्या शेपटावर पाय देऊन त्याला दुखविलें कीं, त्याचा काय परिणाम होतो हें मी तुला आतांच दाखवितों. ( जातो. )

( जंगलाचा देखावा. )

गजेंद्र०—( प्रवेश करून ) सारखे मला अपशकून होताहेत, हें आहे तरी काय? देवा! माझी प्रियकर माता सुरक्षित असली ह्मणजे झालें. येथें येण्यापूर्वीं बैरागी महाराजांना बरोबर घेऊन आलों असतों तर फार बरें झालें असतें!—ही इतक्या लांबची मजल, त्या दुष्ट रुपसीसिंगाच्या विचारांत, आज मी किती तरी लवकर चालून आलों. ( इकडे तिकडे पाहून ) हेंच माझ्या प्रियकर मातेचें वसतिस्थान. ( शोधूं लागतो. ) ह्या उमटलेल्या पावलांवरून येथें खात्रीनें कांहीं तरी दगा आहे. ( पुनः शोधतो. ) माझी आई कुठें आहे? आई—आई—माझ्या प्रियकर आई! तूं कुठें आहेस? आई तूं! संकटांत आहेस असें कळतांच हा मी धांवत आलों आहें ना!—— आई——दुःखानें गांजलेल्या माझ्या प्रियकर आई, तूं कुठें आहेस! मी तुझा गजेंद्र आलों आहें, पण तूं कुठें आहेस? ( पुनः शोध करूं लागतो तों कोंपऱ्यांत जखमी होऊन पडलेला बैरागी त्याच्या दृष्टीस पडतो. ) अरे! हें काय बरें इथें आहे? कोण—बैरागी महाराज! हाय! हाय! तुमची ही अशी अवस्था कुणीं केली? काय ही भयंकर जखम! ( शेला फाडून त्याची जखम बांधूं लागतो ) अरे! ह्याचें सर्वांग तर थंडगार लागतें—छे, देहावसान झालें—हर! हर! गेला बिचारा बैरागी!—तूं तर गेलास; पण तुझ्याबरोबर माझ्या पित्याविषयींच्या सर्व गुप्त गोष्टीही पार नाहींशा झाल्या!—देवा! काय हा प्रसंग! खात्रीनें हें दुष्ट कृत्य त्या रुपसीसिंगाचेंच! चांडाळा! तुझा प्रत्यक्ष काळ असा हा गजेंद्र जिवंत असतां, कपट

साधून, ज्या पापी हातानें ह्या माझ्या सहाय्यकर्त्यावर वार केला असशील, त्याचे ह्या माझ्या विजयेनें राई राईएवढे तुकडे केल्याशिवाय किंवा क्रूर कर्मे करून त्या तुझ्या मस्त झालेल्या कठोर छातीवर पाय देऊन तुझ्या तोंडांत तुझीच रक्तधूळ कोंबल्या-शिवाय हा गजेंद्र कधींहि स्वस्थ बसणार नाहीं, हें खचीत खचीत समज. [ इकडे तिकडे फिरतो, पुनः आईची आठवण होऊन ) आई ! तूं आहेस कुठें! आई—आई—माझ्या प्रियकर आई——

( रुपसीसिंग येतो. )

**रुपसी॰**——गजेंद्रा, आतां मात्र तुला बरोबर पकडलें.

**गजेंद्र॰**——( दांत ओंठ चावून ) बरोबर पकडलें आहेस काय ?

**रुपसी॰**——अरे—हें काय? खून—वा: गजेंद्रा चांगलीं कारस्थानें चालू आहेत! तूं केलेल्या ह्या खुनाची, ते पहा, तुझे हातच चांगली साक्ष देत आहेत.

**गजेंद्र॰**——काय ह्मणतोस ? मीं खून केला ?

**रुपसी॰**——अर्थात्.

**गजेंद्र॰**——रुपसीसिंगा, सांभाळून बोल, जगांतून आजच ईश्वर नाहींसा झाला नाहीं. तूं स्वतः हें निंद्य अघोर कृत्य केलें असून——

**रुपसी॰**——काय? तूं हें शुद्धीवर बोलत आहेस ?—किंवा तुझ्या बुद्धीला भ्रम होऊन——

**गजेंद्र॰**——( मध्येंच ) छे:—मी चांगला शुद्धीवर असून मजपुढें एक खुनी—दुष्ट माणूस—उभा असलेला मी पहात आहें. चांडाळा—

**रुपसी॰**——सांभाळ——गजेंद्रा, सांभाळ——पायरी सोडून चाललास !

**गजेंद्र०**—( तरवार उसपून ) अधमा—पाप्या—चांडाळा ! तूंच आतां सांभाळ. हें घे तुझ्या दुष्ट कृत्याचें प्रायश्चित्त—

( दोघे लढतात. थोड्या वेळानें रुपसीसिंग पळून जातो. गजेंद्रसिंग त्याच्या मागें जातो. )

**गजेंद्र०**—( पुनः रक्तानें भिजलेल्या कपड्यानें प्रवेश करितो. ) दुष्टा! पळालास ह्मणून ह्या गजेंद्राच्या हातून सुटलास! ( थोडा वेळ स्तब्ध राहतो ) पण—माझी आई कुठें आहे? आई, तूं आहेस कुठें? आई—ई—ई— ( मूर्च्छा येऊन पडतो. )

( पडदा पडतो. )

---

## अंक ] प्रवेश २ रा. [ चौथा.

—:o:—

**स्थळः**—राजवाड्याचा दरवाजा.

**रुपसी०**—( हातांत एक बोचकें घेऊन प्रवेश करितो. ) मला वाटत होतें हा गजेंद्र ह्मणजे आजकालचा पोर—पण छेः! काय तो वज्रासारखा त्याचा हात! अब्-ब्-ब्! काल तो माझ्या मागें लागला, परंतु मीच ह्मणून त्या वाघाच्या जबड्यांतून सुटलों. मला वाटत होतें तितकें कांहीं हें काम सोपें नाहीं. त्याच्या बरोबर दोन हात करून त्याला चीत करीन असें नाहीं मला वाटत! आतां ह्यापुढें जर कां मी त्याच्या सपाट्यांत सांपडलों तर मात्र मोठा कठीण प्रसंग! तर आतां असें करून उपयोगीं नाहीं, कांहीं तरी कपटप्रयोगच केला पाहिजे. ( पुढें होऊन ) कोण आहेरे पहाऱ्यावर?

**पहारे०**—मी आहें महाराज. ( मुजरा करतो. )

**रुपसी०**—सरकारस्वारी उठली काय?

**पहारे०**—पाहून येतों महाराज. ( जातो. )

( राजा मानसिंग हुक्का ओढीत बसला आहे. बाजूला हुजऱ्या आहे असा देखावा. )

**राजा**—काय रुपसीसिंग, इतक्या सकाळींच ! मला वाटतें, हें लग्न तुम्हाला सुखाची झोंप देखील येऊं देत नसेल—इतकें कां तुमचें प्रमोदिनीवर प्रेम आहे?

**रुपसी०**—छेः छेः, महाराज, स्वामीकार्यापुढें प्रमोदिनीची आणि त्या लग्नाची काय महती !

**राजा**—( निरखून पहातो ) पण रुपसीसिंग, तुम्ही तर एखाद्या मुलाप्रमाणें घाबरलेले दिसतां?

**रुपसी०**—कां नाहीं दिसणार महाराज! आपणावर तसेंच आपल्या देशावर माझें प्रेम नाहीं का? (थोडा वेळ थांबून भाषणाचा ओघ बदलून ) महाराज, अपराध म्हटला म्हणजे फक्त ' अपराध ' शब्दाकडे नजर देऊन त्या अपराधाची खरी कल्पना कधींहि करतां येणार नाहीं. तसेंच अपराधहि पुष्कळ तऱ्हेचे असतात. एखाद्या खुनी मनुष्याकडून एखादा क्षुल्लक अपराध झाला असला आणि त्या मनुष्याच्या खुनी वर्तनावरून त्याच्या अपराधाची चौकशी केली तर तो क्षुल्लक अपराध आपणाला भयंकरसा भासेल. तद्वत एखाद्या पापभीरु मनुष्याकडून त्याच्या चुकीनें जर भयंकर अपराध झाला असला आणि आपण त्या मनुष्याच्या चांगल्या वर्तनावरून त्याच्या त्या भयंकर अपराधाची चौकशी केली तर तोच भयंकर अपराध आपणाला क्षुल्लक वाटेल. म्हणून अशा बाबतींत फार चौकस दृष्टीनेंच अपराध्याची चौकशी केली पाहिजे.

**राजा**—पण रुपसीसिंग, तुम्हीं हें कोणाच्या अपराधाविषयीं बोलतां?

**रुपसी०**—महाराज, मला तीच गोष्ट सांगण्याचा धीर होत

नाहीं—मी आतां जातों आणि त्या गोष्टीचा नीट विचार करून मग महाराजांना ती गोष्ट सांगतों. महाराजांनीं आतां मला रजा द्यावी.

**राजा**—( उतावीळ होऊन ) नाहीं—रुपसीसिंग, मला असें संशयांत ठेवूं नका.

**रुपसी०**—( खिन्न मुद्रा करून ) काय सांगूं महाराज ! डोळ्यांनीं पाहिली नसती तर कधींहि—प्राण गेला असता तरी देखील—त्या गोष्टीवर मीं विश्वास ठेवला नसता. पण—

**राजा**—सांगा, सांगा रुपसीसिंग; माझें मन ऐकण्याविषयीं उतावळि झालें आहे. काय गडबड आहे, येऊं द्या कांनीं एकदांची.

**रुपसी०**—महाराजांच्या हुकूमावरून नेहमींप्रमाणें काल रात्रीं मी वेशी तपासण्याकरितां गेलों होतों. सर्व वेशी पाहून, पूर्व वेशीवर आलों, त्या वेळीं मध्यरात्र झाली होती. अशा अपरात्रीं आपले नवीन सरदार गजेंद्रसिंग—

**राजा**—हँ, हँ, रुपसीसिंग, सांभाळा, आपल्या तरुण सरदाराविषयीं तुह्मीं बोलतां !

**रुपसी०**—होय सरकार, मीं पूर्वींच सांगितलें आहे कीं, स्वतः जर पाहिलें नसतें तर अशा गोष्टीवर क्वचित्च विश्वास ठेवला असता. अशा अपरात्रीं त्याला वेशीबाहेर पाहतांच मला फार आश्चर्य वाटलें. मला त्याचा संशय येऊन मी त्याच्या मागोमाग गेलों. आपल्या मागून कोणीं येत असावें अशी त्याला कल्पनाहि नव्हती. वेशीपासून दूर अंतरावर एका झोंपडीजवळ गेल्यावर मारेकऱ्याप्रमाणें त्यानें आपल्या अस्तन्या चढविल्या. इतक्यांत एक वृद्ध मनुष्य झोंपडींतून बाहेर आला. त्याला पाहतांच ‘ पळविलीस काय

तिला ' असें म्हणून त्यानें त्या निरपराधी वृद्ध मनुष्यावर वार केला. मी त्याला सोडविणार तोच वाघासारखी त्यानें मजवर उडी घेतली.

**राजा**—( मान हालवून ) नाहीं—रुपसीसिंग, मी ही गोष्ट कधींहि कबूल करणार नाहीं. त्या तरुण सरदारानें परवां दाखविलेलें शौर्य पाहून द्वेषामुळें तुह्मी हें असें सांगतां.

**रुपसी॰**—काय ! माझ्या शब्दावर महाराजांचा विश्वास नाहीं ? इतक्यांत मी गैरविश्वासी—बेइमान झालों ! ह्या जखमा पहा—हें कपडे पहा. ( जखमा आणि कपडे दाखवितो. )

**राजा**—तसें नव्हे हो; प—ण—

**रुपसी॰**—द्वेषामुळें मी कांहीं तरी सांगतों, असेंच कीं नाहीं! एकंदरीनें महाराजांचा मजवर विश्वास नाहीं. हेंच खास. शिव ! शिव ! आजपर्यंत नेकीनें केलेली स्वामीसेवा—

**राजा**—विश्वास ! रुपसीसिंग, तुमच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. सांगा, पुढें त्या चांडाळानें काय केलें ?

**रुपसी॰**—मग मोठ्या शौर्यानें त्या खुनी गजेंद्राला मी पकडलें. आमच्या झटापटींत तोहि थोडा घायाळ झाला. मीं त्याला पुष्कळ विचारलें; शेवटीं राजाज्ञेवरून मी गस्त घालीत आहें, तेव्हां संशयात्मक गोष्टीची शहानिशा करण्याचा मला पूर्ण अधिकार आहे हेंहि मीं त्याला सांगितलें. तेव्हां तो म्हणाला ' जा तुला मुर्दाडाला मी भीक घालीत नाहीं. तूं कोण ? मीं खून केला—वाटेल तें केलें—तूं मला विचारणार कोण ? '

**राजा**—( रागानें ) असें तो म्हणाला ?

**रुपसी॰**—महाराज, इतकेंच बोलून तो थांबला नाहीं. याहूनहि

विशेष अकलेचे तारे तोडलेन् त्यानें. त्यानें राजाज्ञेची,तसेंच राजाज्ञा देणाराची ह्मणजे प्रत्यक्ष आपली निर्भर्त्सना केली.

**राजा**—काय ? माझा प्रत्यक्ष अपमान !–आणि त्या कार्ट्या-कडून ! ( क्षणभर थांबून ) अरेरे ! जग हें किती बेइमान आहे पहा ! ज्याला मीं इतक्या उच्च पदाला चढविलें, त्यानेंच माझा असा उपमर्द करावा काय ? रुपसींसिंग—

**रुपसी०**—( हात जोडून ) महाराज.

**राजा**—तुह्मी आतांच्या आतां जाऊन त्याला कैद करण्याची व्यवस्था करा. आणि त्याची स्वतः चौकशी करून, तो दोषी ठरल्यास, दया माया कांहीं एक न दाखवितां, योग्य ती शिक्षा करा. जा मला आतां थोडा वेळ स्वस्थ पडूं द्या. ( पडदा पडतो. )

**रुपसी०**—( हांसत हांसत ) आणखी काय पाहिजे ! आतां एकदम शें–दोनशें स्वार पाठवून त्याला कैद करून आणतों आणि चौकशीच्या वगैरे भानगडींत न पडतां देतों चढवून एकदम सुळावर ! ( जातो ).

---

## अंक ] प्रवेश ३ रा. [ चौथा.

—:०:—

**स्थळः**—अरवलीच्या पहाडांतील झोंपडें.

( गजेंद्रसिंग मूर्च्छित पडला आहे. )

**रजपूत**—( प्रवेश करून ) माताजीवर संकट येणार हें कळतांच मोठ्या शिताफीनें त्यांना एका सुरक्षित ठिकाणीं नेऊन ठेवलें. आतां येथील हालचाल पाहून मग पुढली व्यवस्था करूं. अरे, पण हें काय ? माताजीच्या झोंपडीजवळ हा कोण जखमी होऊन प

डला आहे! येथें खात्रीनें कांहीं तरी दगा आहे खास! माताजीला येथून नेलें म्हणून ठीक झालें; नाहींतर आज काय प्रसंग आला असता---

( गजेंद्र शुद्धीवर येतो. )

**गजेंद्र**०---( खोल आवाजांत ) मी येथें कसा आलों!--हं, आतां आठवलें!--माझ्या हितकर्त्याचें--बैराग्याचें इथलें प्रेत काय झालें? बाबा, तूं कोण?--इथल्या प्रेताला कोणीं नेलें.

**रज**०---प्रेत! कोणाचें?

**गजेंद्र**०---त्या म्हाताऱ्या बैराग्याचें.

**रज**०---म्हाताऱ्या बैराग्याचें प्रेत! येथें नेहमीं येत असे त्या म्हाताऱ्या बैराग्याचें प्रेत म्हणतोस? कोणीं मारलें त्याला?

**गजेंद्र**---परमेश्वर जाणें!---त्याचा काल रात्रीं खून झाला.

**रज**०---खून!--पण तुझे हात रक्तानें माखलेले दिसताहेत.

**गजेंद्र**०---( हातांकडे तसेंच आपल्या पोशाखाकडे पाहून ) होय आहेत खरे रक्तानें माखलेले--पण मीं कांहीं त्याला मारलें नाहीं. एक निराश्रित बाई संकटांत आहे असें कळतांच रात्रीं मी येथें तिच्या साह्यार्थ आलों. त्यावेळीं तो गरीब बिचारा बैरागी येथें मरून पडला होता. त्या बाईचा मीं येथें पुष्कळ शोध केला, परंतु तिचा पत्ता लागला नाहीं. पुनः येथें आलों तों त्या बाईचा शत्रु या ठिकाणीं आलेला मला दिसला. आमची पुष्कळ झटापट झाली. शेवटीं तो माझ्या हातून निसटून गेला. मग अतिशय श्रमामुळें मला मूर्च्छा आली.

**रज**०---( स्वगत ) हा मनुष्य शत्रु आहे कीं मित्र आहे हें ओळखावें कसें!

**गजेंद्र०**—का बाबा, गप्पसा राहिलास तूं ? ती बाई कुठें गेली तें तुला माहीत आहे काय ?—होय, खात्रीनें तुला माहीत आहे. बोल, बोल, ती बाई कुठें गेली ? अरे, असा वेड्यासारखा काय पाहतोस ! सांग, सांग ती बाई कुठें गेली सांग.

**रज०**—तूं विचारतोस त्यापैकीं मला कांहीं एक माहीत नाहीं. पण त्या बाईबद्दल तूं इतकी विचारपूस कां करतोस ? तुझें नांव—

**गजेंद्र०**—माझें नांव गजेंद्रसिंग.

**रज०**—( आश्चर्यानें ) सरदार गजेंद्रसिंग ! आह्मांला बंडखोरांपासून सोडविणारे ! ! महाराज—

**गजेंद्र०**—मी तुमच्यावर कांहीं उपकार केले असतील, मन्नविषयीं तुमच्या मनांत कांहीं प्रेम असेल, तर ती बाई कुठें गेली तें मला सांग.

**रज०**—पण ती बाई आपलें ठिकाण फार गुप्त ठेवीत असते; म्हणून म्हणतों तिनें जर आपणाला भेटण्याची कदाचित् मनाई केली तर—

**गजेंद्र०**—मग मी तिचा शत्रु आहें असें तुला वाटतें काय ?

**रज०**—नाहीं महाराज, आपण उदार आहांत. आपणांकडून तिला दगा पोंचणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. प—ण—

**गजेंद्र०**—ह्यावरून तूं त्या बाईच्या विश्वासांतील कोणी आहेस असें दिसतें. मग ऐक. ती बाई दुसरी तिसरी कोणी नसून प्रत्यक्ष माझी आई आहे.

**रज०**—माताजी आपली आई !

**गजेंद्र०**—होय, ती माझी आई आहे. आतां तरी तिच्या ह्या दुर्दैवी मुलाला सहाय्य कर.

रज०—महाराज, मजकडून शक्य तितकें मी सहाय्य करीन; पण पहिल्यानें मी थोडीं फळें आणून देतों तीं खा. आपल्या अंगांत बिलकूल त्राण उरलेलें दिसत नाहीं. (जातो.)

गजेंद्र—आई ! माझ्या प्रियकर आई ! तूं आतां कुठें आहेस ? शत्रूच्या भयानें आज कितीतरी वर्षें रानांवनांतून फिरली असशील ! हाय ! हाय ! हे करुणाकरा ! अद्यापि आमचें नष्टचर्य संपलें नाहीं कारे ? पहिल्या खेपेसच जर तुझ्या शत्रूंचीं नांवें मला सांगितलीं असतीस तर, आई ! आजचा हा प्रसंगच येऊं दिला नसता. (रजपूत फळें घेऊन येतो.)

रज०—महाराज, हीं रसानें भरलेलीं परिपक्व फळें आपण खावीं म्हणजे थोडी बहुत आपल्याला हुशारी येईल. (गजेंद्रसिंग फळें खाऊं लागतो. एक शेतकरी येतो.)

रज०—(त्याच्याजवळ जाऊन) अरे, माताजीला सोडून तूं येथें कशाला आलास ?

शेत०—पण तो–बसला आहे तो कोण ?

रज०—तो आपल्याचपैकीं एक आहे. कां ?

शेत०—(कपाळावर हात मारून) काय सांगूं ! दैवापुढें कोणालाहि जाववत नाहीं !

रज०—म्हणजे ! झालें तरी काय ? (फळें टाकून गजेंद्रसिंग त्याच्याजवळ जातो.)

शेत०—काल तुम्ही माताजीला त्या गुहेंत आणून ठेवलें; आणि थोड्या वेळानें कांहीं स्वार येऊन त्यांनीं एकदम कापाकापीला सुरवात केली–!

रज०—(उत्कंठेनें) पण माताजीचें काय झालें तें सांगा आधीं.

शेत०—ते स्वार येतांच त्या गुहेंत गेल्या—
रज०—( जास्त उत्कंठेनें ) पण माताजी सुरक्षित आहे ना ?
शेत०—काय सांगावें ! त्या कापाकापींत जर—
गजेंद्र—हाय हाय ! मी हें काय ऐकतों ( मोठ्यानें ) आई-ई-

( मूर्च्छित पडतो. )

( पडदा पडतो. )

---

## अंक ] प्रवेश ४ था. [ चौथा.

—:०:—

स्थळः—उदयसिंगाचा वाडा.

( राजा मानसिंग आणि उदयसिंग प्रवेश करितात. )

राजा—उदयसिंगा, आज कैक वर्षें त्यानें माझी इमानें इतबारें नोकरी केली; दोन चार वेळां माझ्याकारितां त्यानें स्वतःचा प्राणहि धोक्यांत घातला; शिवाय, तुझ्या लक्षांत असेलच, माझ्या नांवाला अपकीर्तीचा लागणारा तो टिळा मोठ्या चातुर्यानें त्यानेंच टाळला. हें सर्व लक्षांत आणून, मी त्याला त्याच्या असाधारण गुणांचा योग्य मोबदला देऊं नये काय ? असा शूर पति प्रमोदिनीला योग्य नाहीं असें का तुला वाटतें ?

उदय०—छेः त्याविषयीं माझें बोलणेंच नाहीं. पण त्याच्या वयाकडे पाहतां—

राजा—मला वाटतें, रुपसीसिंगाचें वय फार झालें तर बत्तीशीच्या आंत बाहेर असेल नसेल. हें वय कांहीं फार नाहीं !

उदय०—जाऊं द्या त्या गोष्टी महाराज. प्रमोदिनीबद्दल मी आपला शब्द देऊन चुकलों आहें. इतकेंच आतां, त्याच्यापासून तिला सौख्य प्राप्त झालें म्हणजे आपण तिच्या ऋणांतून सुटलों.

**राजा**---त्याविषयीं तूं बेफिकीर रहा. तिला मी माझीच मुलगी समजतों. तिच्या सौख्याची तूं बिलकूल काळजी करूं नकोस. जा, तिलाच वर घेऊनये म्हणजे तिची आवडनिवड आतांच आपल्याला समजेल. ( उदयसिंग जातो. ) मला वाटतें, गजेंद्रसिंग आणि ही एकत्र वाढल्यामुळें यदाकदाचित् त्यांचें एकमेकांवर प्रेमहि जडलें असेल. पण---( प्रमोदिनी येते. ) कां प्रमोदिनी, आतां तूं एका लहानशा संस्थानिकाची पत्नि होणार ! मला वाटतें, हेच आनंदाचे विचार तुझ्या स्वप्नांत देखील येत असतील. ( पदरानें ती आपले डोळे पुसते. ) वेडे, तूं अशी लाजतेस कां ? हें पहा, तुमचा विवाह झाल्यावर सरदार रुपसीसिंगाला मी याहीपेक्षां उच्च पदावर चढविणार आहें---बादशहाकडून त्याला बंगालची सुभेदारी देणार आहें.---काय समजलीस ? मग तर तूं सुखी होशील ना ?

**प्रमो०**---होय महाराज. मग मी सुखी होण्याचा प्रयत्न करीन.

**राजा**---( चपापून ) म्हणजे ! तूं आतां सुखी नाहींस कीं काय ?

**प्रमो०**---आहें---फार सुखी आहें मी ! ( हुंदके देते. )

**राजा**---( तिला जवळ ओढून ) प्रमोदिनी, तुझें रुपसीसिंगावर प्रेम नाहीं का ! ( ती जास्त हुंदके देते. ) मग कुणावर, तुमच्या घरीं वाढलेल्या त्या गजेंद्रावर का तुझें प्रेम आहे ? ( ती त्याच्याकडे पाहूं लागते. ) मला वाटलेंच तें ! पण प्रमोदिनी, तूं त्याच्या पाशांतून सुटलीस हें एका अर्थी मोठेंच भाग्य समज. तुझ्या निर्मल प्रेमाला तो गजेंद्र बिलकूल योग्य नाहीं.

**प्रमो०**---कारण, त्यांचें कूळ उच्च नाहीं म्हणून !

**राजा**---छे: छे:, कुलशीलाची गोष्टच नाहीं. तो गुन्हेगार आहे.

प्रमो०—थांबा महाराज, त्यांच्याविषयीं उगाच खोट्यानाट्या गोष्टी सांगून त्यांच्यावरून माझें मन उडविण्याचा प्रयत्न करण्याची आपणाला मुळींच जरूरी नाहीं—त्यांच्याविषयीं सर्व आशा मीं केव्हांच सोडून दिल्या आहेत.

राजा—प्रमोदिनी, मी खरेंच सांगतों, त्यानें एक मोठा भयं-कर गुन्हा केला आहे.

प्रमो०—काय केला आहे गुन्हा !

राजा—त्यानें एका वृद्ध मनुष्याचा खून केला आहे.

प्रमो०—( त्वेषानें ) खोटें—अगदींच खोटें. माझी खात्री आहे, कोणी तरी दुष्टानें—त्यांच्या वैऱ्यानें, हें त्यांच्यावर निव्वळ कुंभाड रचलें आहे.

राजा—पण मी सांगतों—मी—मानसिंग. माझ्यावर तुझा विश्वास आहे—नव्हे ? मी असत्य बोलेन असें तुला वाटतें ?

प्रमो०—काय! मग गजेंद्रसिंग खुनी—छेः ! प–ण–तुम्ही—सांगतां–हाय ! हाय !

( मूर्च्छित पडते. )

राजा—कोण आहेरे तिकडे ? (उदयसिंग आणि एक नोकर येतात.) उदयसिंगा, हिला मूर्च्छा आली आहे; सांभाळा. ( तिला नेतात. ) मला वाटलें होतें त्याचप्रमाणें शेवटीं झालें! मीं केलेली वरयोजना प्रमोदिनीला पसंत पडेल असें वाटलें होतें; परंतु नाहीं—आतां ह्या गोष्टी फिरवितां येत नाहींत. काय करावें ? तिचीच आतां कशी तरी समजूत घातली पाहिजे.

( जातो )

## अंक ] प्रवेश ५ वा. [ चौथा.

—:o:—

स्थळः—अरवलीच्या पहाडांतील झोंपडी.

रजपूत—( प्रवेश करून ) सतत चार दिवस बेशुद्ध स्थितींत राहून नुकतेच कुठें शुद्धीवर आले तों आज दोन दिवस त्यांचें वर्तन म्हणजे एखाद्या भ्रमिष्टासारखें ! सरदारसाहेबांना सोडून माताजीच्या शोधाला जाईन म्हटलें तर यांना सांभाळणार कोण ? ही पंचाईत.

( गजेंद्रसिंग प्रवेश करितो. )

गजेंद्र०—( इकडे तिकडे पाहून ) आई—माझ्या प्रियकर आई ? मी तुझा गजेंद्र ना तुला हांका मारतों आहें—आई, कुठें आहेस तूं? मला गडे ओ देईनास—!

रज०—महाराज, आपण थोडा वेळ स्वस्थ पडून रहा म्हणजे अम्मळ बरें वाटेल.

गजेंद्र०—आतां ह्या देहाला स्वस्थता नाहीं. गेले–ते दिवस गेले–पार–पार गेले—

( सशस्त्र सहा शिपाई येतात. )

गजेंद्र०—( त्यांच्याकडे पाहून ) कोण जमादार !

जमा०—होय महाराज. आपणाला नेण्याकरिता आलों आहें.

गजेंद्र०—मला नेण्याकरितां ! कुठें ?

जमा०—महाराज, या दासाला क्षमा करा—मी हुकुमाचा चाकर आहें. आपणाला कैद करण्याचा महाराजांचा हुकूम आहे.

गजेंद्र०—कैद ! मला कैद ! ! कशाबद्दल ?

जमा०—एका म्हाताऱ्याचा खून केल्याबद्दल. आज दहा दिवस

झाले, आम्ही आपला शोध करीत आहोंत. फार दूरदूरच्या मुक्कामीं स्वार पाठविले आहेत. तुम्ही सांपडाल तेथून तुम्हांला कैद करून आणण्याचा सक्तीचा हुकूम सुटला आहे.

**गजेंद्र**०—हुकूम कोणीं दिला ?

**जमा**०—महाराजांनीं.

**गजेंद्र**०—आरोप कोणीं ठेवला ?

**जमा**०—सरदार रुपसीसिंगानें.

**गजेंद्र**०—अस्सें—मला वाटलेंच तें !—पण मला घेऊन तुह्मीं कोठें जाणार ?

**जमा**०—जयपुरांत. महाराज येईपर्यंत तुम्हाला जयपुरांत ठेवायचें.

**गजेंद्र**०—मग महाराज गेले आहेत कुठें ?

**जमा**०—अंबरनगरींत. सरदार उदयसिंगाच्या मुलीच्या लग्नाला.

**गजेंद्र**०—( आश्चर्यानें ) प्रमोदिनीचें लग्न ! कुणाबरोबर ?

**जमा**०—सरदार रुपसीसिंगाबरोबर.

**गजेंद्र**०—( रागानें ) काय, हें मीं काय ऐकलें ! प्रमोदिनीचें लग्न—आणि तें त्या चांडाळ, पापी, खुनी रुपसीसिंगाबरोबर !—नाहीं—नाहीं—हा गजेंद्र जिवंत असतांना त्या निरपराधी, सुस्वभावी, निर्मळ, कोमल प्रमोदिनीचा अशा हरामखोर, दुष्ट, पाजी मनुष्याकडून कधींहि अपमान होऊं देणार नाहीं. जमादार, चला मला घेऊन एकदम अंबरनगरींत. सत्याचा जय झालाच पाहिजे.

**जमा**०—पण जयपुरांत आपणाला अटकेंत ठेवण्याचा सरदार रुपसीसिंगाचा हुकूम आहे.

**गजेंद्र०**——समजलों——असा हुकूम देण्याचें कारण तो चांडाळ माझ्या हातून सुटूं पहात आहे——जमादार, माझ्यावर तुमचें प्रेम नाहीं का ?

**जमा०**——प्रेम !——महाराज, आपणाकरितां हा प्राण देखील देईन. मग प्रेमाची गोष्ट काय !——पण काय करूं ! हुकुमानें जखडलों गेलों——

**गजेंद्र०**——हरकत नाहीं. जमादार, इतकेंच मात्र, रुपसीसिंगाचें लग्न होण्यापूर्वीं मला महाराजांना एकदां भेटूं द्या. त्याबद्दल तुमच्यावर महाराज रागावले तर त्याचा जोखीमदार मी. ( जातात)

**चौथा अंक समाप्त.**

---

# अंक पांचवा.



## प्रवेश १ ला.

—:०:—

स्थळ—उदयसिंगाच्या वाड्यांतील बाग.

**प्रमोदिनी**—( सचिंत ) मी त्या दुष्ट बातमीवर कसा विश्वास ठेवूं ! असलं घाणेरडं कृत्य गजेंद्रसिंगाच्या हातून—छेः छेः, कध्धीं—कध्धीं होणार नाहीं, अशा सत्यप्रिय मनुष्याकडून स्वप्नांत तरी असलं कृत्य होईल का ! ( बराच वेळ स्तब्ध बसते. ) आई, माते अंबे ! फक्त रजपुताच्या वचनाकरितां आज माझ्या प्रेमाची आहुति पडली तरी पुढल्या जन्मीं माझी निराशा करूं नकोस—गजेंद्रसिंगाच्या संगतीनें एखाद्या भिकार झोंपडींत राहून जें सुख मला झालं असतं, तें सुख बंगालची सुभेदारी—नव्हे त्याहिपेक्षां उच्च असं जयपूरचं स्वामित्व ज्याला आहे, त्याच्या संगतीपासून होणार नाहीं—मना, कर विचार—आजचा दिवस त्या रमणीय मूर्तीविषयीं वाटतील तितके विचार कर— ( मागून रुपसीसिंग प्रवेश करतो. )

**रुपसी०**—प्रमोदिनी, मला येथें येऊन आज दोन दिवस झाले. परंतु तुझी ही रम्य मूर्ति एकदां देखील माझ्या दृष्टीस पडली नाहीं इतका का मी अभागी आहें ? कालपासून एकाएकीं तुझी नाजूक प्रकृति नादुरुस्त झाली असें बाबासाहेब सांगत होते. तें ऐकल्यापासून माझ्या जिवाची सारखी तळमळ सुरूं आहे. तुला असें एकान्तीं भेटावें असा मी केव्हांपासून योग पहात होतों.—पण मला सांग, आतां तुला कसें वाटतें ?

**प्रमो०**—( कुऱ्या नजरेनें पहात ) बरं वाटतं.

**रुपसी०**—( स्वगत ) गजेंद्राविषयीं मला जो संशय आला आहे, तो आतांच फेडून घ्यावा. ही संधी चांगली आहे. ( उघड ) प्रमोदिनी, तो तुमच्याकडे वाढलेला पोर सरदारी मिळतांच येथून पळून गेला–( प्रमोदिनी त्याच्याकडे क्रूर मुद्रेनें पहाते. ) तो मोठा हरामखोर होता असें बाबासाहेब सांगत होते, खरें का ?

**प्रमो०**—( रागानें ) तुम्हाला हें कुणी सांगितलं ? बाबा असं म्हणाले—आत्तां जाऊन बाबांना विचारतें मी. ( जाऊं लागते. )

**रुपसी०**—( गोंधळून ) बाबासाहेब कांहीं तसें नाहीं म्हणाले; पण—मी तुला विचारतों—

**प्रमो०**—गजेंद्रसिंग असं नीच वर्तन करतील असं तुम्हीं मनांत देखील आणूं नका.

**रुपसी०**—( जरा रागानें ) म्हणूनच परवां त्यानें खून केला.

**प्रमो०**—हें निखालस खोटं आहे. कोणी तरी दुष्टानं हें त्यांच्यावर कुभांड रचिलं आहे. ( रागानें तोंड फिरविते. )

**रुपसी०**—( स्वगत ) झाली खात्री. हिचें प्रेम माझ्या शत्रूवर आहे. बरें— ( पुढें होऊन तिचा हात धरतो. ) प्रमोदिनी, जाऊं दे त्या गोष्टी.

**प्रमो०**—( रागानें त्याच्या हाताला हिसडा देऊन हात सोडविते. ) खबरदार माझ्या अंगाला स्पर्श कराल तर !

**रुपसी०**—( हसत हसत ) असें म्हणून कसं चालेल ! आतां तुझ्या ह्या देहाची मालकी सर्वस्वीं आमचीच होणार आहे.

**प्रमो०**—दुर्दैवानं झालीच तर मग त्याच्यावर तुम्हीं आपलं स्वामित्व गाजवा–परंतु जोंपर्यंत विवाहरज्जूनं हा देह कुणाशीं बां-

धला गेला नाहीं तोंपर्यंत ह्या देहाला कोणाचाच स्पर्श मी होऊं देणार नाहीं. (रागानें निघून जाते.)

रुपसीं०—असें काय? गाजवीन तर तुझ्या देहावर आपला पुरा अंम्मल मी गाजवीन. (जातो. )

## अंक ] प्रवेश २ रा. [ पांचवा.

—:०:—

स्थळ--उदयसिंगाच्या वाड्याची वेस.

( धोलासिंग आणि प्रमिला येतात. )

**धोला०**—इतका का तो नीच आहे? माईसाहेब, ह्या वेळीं तो वाड्यांत आहे. आपली आज्ञा मात्र व्हावी—बाबासाहेबांजवळ जरी तो बसलेला असला तरी तेथें जाऊन त्यांच्या समक्ष त्या चांडाळाला त्याच्या पापाचें प्रायश्चित्त देतों.

**प्रमिला**—थांब. असा विकारवश होऊं नकोस—जरा शांत हो. त्याच्या पापाचा घडा पूर्ण भरूं दे. माझी जर त्या सर्वसाक्षी जगच्चालकावर पूर्ण श्रद्धा असेल तर अनाथांचं रक्षण करणार तो कनवाळू परमेश्वर शेवटीं सत्याचाच जय करील.

**धोला०**—माईसाहेब, मी आतां पूर्ण शांत झालों. सांगा, त्या रजपुतानें तुम्हांला एका सुरक्षित ठिकाणीं ठेवलें मग?

प्रमिला----त्या विश्वासू रजपुतानं एका सुरक्षित ठिकाणीं मला नेऊन ठेवलं, परंतु तेथेंहि शत्रूचा हल्ला आला. त्या चाडाळांनीं क्रूरतेनं चालविलेली ती कापाकापी पाहून माझ्या हृदयानं ठाव सोडला. त्यांच्या तावडींतून मी मोठ्या शिकस्तीनं पळालें.

**धोला०**—हर हर ! काय हा वनवास ! प्रत्यक्ष राज्याची

स्वामिनी आणि तिच्या नशिबीं हा हृदयभेदक खडतर वनवास ! हायरे दुर्दैवा ! !

**प्रमिला**—धोलासिंगा, ह्या दुःख स्थितीबद्दल शोक करीत बसणं आतां उचित नाहीं.

**धोला०**—माईसरकार, काय करूं ! दुःखानें हें हृदय पोळतें आहे ना ! बरें, मग त्या कापाकापीचें पुढें काय झालें ?

**प्रमिला**—ती कापाकापी चालली असतां मी मोठ्या शर्तीनं तेथून पळालें. एकटीच मग त्या भयाण रात्रीच्या प्रहरीं, जंगलांतून जिवाच्या धास्तीनं कांट्याकुट्यांना न जुमानतां सारखी भटकत होतें. शेवटीं एक सुरक्षित गुहा मला आढळली. त्या भयंकर ठिकाणीं क्रूर श्वापदांच्या संगतीनं, दैवावर हवाला ठेवून, आठ दिवस काढले. तों परवां एकाएकीं तो विश्वासू रजपूत माझा शोध करीत तेथें आला. त्यानं ती हृदय पिळून टाकणारी हकीकत सांगतांच धांवपळ करीत मी इथें निघून आलें. त्या चांडाळ रूपसिंगानं गरीब बिचाऱ्या सहिदसिंग बैराग्याला भयंकर रीतीनं स्वतः मारून, उलट त्याचा खून केल्याच्या आरोपावरून माझ्या गजेंद्राला कैद केलं आहे. मी इतक्या तांतडीनं इथें येण्याचं कारण, माझ्या गजेंद्राची जर सरकारांनीं स्वतः न्यायानं चौकशी केली तर ठीकच आहे; नाहींतर, ह्या वेशानं स्वतः महाराजांसमोर जाऊन, त्या दुष्टाच्या एकंदर कृष्णकृत्यांची खरी खरी हकीकत महाराजांना सांगून, त्यांच्या जवळ योग्य--खरा न्याय मागेन. आतां इतकंच काम कर कीं——

**धोला०**—सांगा, हा दास तयार आहे.

**प्रमिला**—बैरागी अद्यापि जीवंत आहे असं मला इकडे येतांना वाटेंत कळलं. त्याला तूं स्वतः जाऊन इकडे घेऊन ये. तूं त्याला

घेऊन परत येईपर्यंत मी ह्या वाड्यांतच गुप्त रीतीनं राहतें; ह्मणजे त्या दुष्टावर नजर ठेवायला ठीक पडेल.

धोला०—ठीक आहे. सहिदसिंगाला मी घेऊन येतों. जाऊं मी आतां ?

प्रमिला—जा. ( जातात )

---

## अंक ] प्रवेश ३ रा. [ पांचवा.

—:०:—

स्थळ—दिवाणखाना.

( राजा मानसिंग कोचावर एकटाच बसला आहे. )

राजा—आज इतक्या वर्षांनीं मी ह्या अंबर नगरींत आलों; पण ह्या वाड्यांत पाऊल टाकतांच ह्याच ठिकाणीं घडलेल्या त्या चिरस्मरणीय गोष्टीची आठवण होऊन माझ्या मनाला सारखी तळमळ लागली आहे !—जी थोड्या वेळांत माझा कलीजा बनली होती, जिच्यावर माझें अत्यंत प्रेम, जिच्या बरोबर मीं ह्या ठिकाणीं प्रेमानें कित्येक विलासाचे खेळ खेळलों त्या स्वप्नाप्रमाणें अनुभवलेल्या प्रत्येक सुखाच्या कृतीची आठवण होऊन आज माझ्या मनाला बिलकूल चैन नाहीं. प्रमिले ! तुझ्यावर इतकें अकृत्रिम प्रेम करून शेवटीं तूं माझ्या कीर्तीला कलंक लावलास—माझ्या सौख्याचा नायनाट करून आज माझी स्थिति एखाद्या दीनवाण्याप्रमाणें करून टाकलीस ! हर हर, परमेश्वरा ! आज काल खऱ्या प्रेमाला मोबदला नाहीं कारे ! मजपेक्षां एखाद्या कंगाल झोंपडींत राहून एकमेकांवर पूर्ण प्रेम ठेवून सुखानें काळ घालविणारें गरीब जोडपें बरें! पण मी एवढा राजा असून प्रेमाच्या



राजा०—( एकदम दचकून भीत भीत ) को—ण प्रमिला?

The Bombay Art Printing Works, Fort.

पान ९१.

अभावीं एखाद्या दीनापेक्षां दीन झालों आहें! देवा!–आतां मला ते पूर्वींचे सुखाचे दिवस दिसतील काय ?

( पड्यांत 'होय ' उत्तर येतें. मानसिंग चकित् होऊन उठून पाहूं लागतो तोंच चोर दरवाजा उघडून शुभ्र वस्त्रानें वेष्टिलेली अशी प्रमिला येते. )

**राजा०**—( एकदम दचकून भीत भीत ) को–ण प्रमिला ?

( बेशद्ध पडतो. )

---

## अंक ) प्रवेश ४ था. ( पांचवा.

—:०:—

### स्थळ—रस्ता.

( एक तेलंगी ज्योतिषि येतो. )

**जोतिषि**—काशीपासून रामेश्वर फिरले, मोठा ज्योतिष्यी ठरले; हे मोठे मोठे मानपत्र मिळाले ( हातांतील गुंडाळें सोडतो. ) पण कोणीहि विचारतो नाहीं. हें म्लेंछराज्य आलें, त्यानें धर्म बुडाले, शास्त्र बुडालें, सर्व बुडालें. आम्ही मोठ्ठा ज्योतिष्यी–पुष्कळ पैसा मिळतो म्हणून दक्षिण हिंदुस्थान गेले–पण रामाऽआरे या! सर्व भ्रष्टाकार झाले, सब् गोलंकार झाले–पळाले, पळाले, इकडे आले. नदींत गेलें सर्व धुतलें, कपडे धुतले, मानपत्र धुतलें आतां शुद्ध झालें.( घोलासिंग येतो.)

**धोला०**—कोण आहे ?

**जोति०**—आम्ही मोठ्ठा ज्योतिष्यी आहे. हें आमचें मानपत्र बघा. ( हातांतील गुंडाळें सोडतो. )

**धोला०**—( स्वगत ) ह्या ज्योतिषाला आपल्या मनांतील प्रश्न विचारावा. पाहू तर खरें काय काय दैवाचे खेळ आहेत ते. ( उघड ) महाराज, मी एक प्रश्न विचारूं का ?

जोति०---विचारतो कशाला ? प्रश्न विचारलें तर लहान मुला सांगेल. आम्ही तसा ज्योतिष्यी नव्हे--मोठा ज्योतिष्यी आहे. तुम्ही मनांत प्रश्न धरा आणि आम्हाला देवाचा नांव सांगा. मग आम्ही तुमचा प्रश्न सांगतें आणि उत्तर सांगतें.

धोला०---( क्षणभर थांबून ) भोला शंकर.

जोति०--बस्स. ( नाकाला दोन बोटें लावून बोटें चाळतो, ) तुमचा प्रश्न फार मोठा आहे. आम्ही समजलें, त्याचें उत्तर--उद्या सूर्योदय झालें, चार प्रहर लोटले कीं, सत्याचें जय होतो--ह्या राजाचे स्वामी पुनरपिगमन होतो--दुष्ट मरून जातो--सर्व आनंदानंदे होतो.

धोला०---( आनंदानें ) तुमच्या तोंडांत साखर पडो ज्योतिषि बुवा. ( दोन मोहरा काढून देतो व नमस्कार करून जातो. )

ज्योतिं०---पुष्कळ दिवस झाले आतां हे पैसा पाहिले.

( दोन ब्राह्मण येतात. )

१ **ब्राह्मण**---( नमस्कार करून ) कोण हो तुम्ही ?

२ **ब्राह्मण**---कुठून आलांत ?

१ **ब्राह्मण**---केव्हां आलांत ?

२ **ब्राह्मण**---चाललात कुठें ?

१ **ब्राह्मण**---नांव काय आपलें ?

२ **ब्राह्मण**---देश कोण आपला ?

१ **ब्राह्मण**---बिऱ्हाड कुठें केलें ?

२ **ब्राह्मण**---खाणावळ कुठें पाहिली ?

१ **ब्राह्मण**---( मिताला वेडावून ) तुझ्या घरीं.

२ **ब्राह्मण**---( त्याला चापट मारून ) मूर्ख कुठला ! एकदम सर्व प्रश्न त्यांना विचारतोस, तर उत्तर तरी कुठल्या तोंडानें देतील?

**१ ब्राह्मण**—तुझ्या तोंडानें. गाढवा एक एक प्रश्न विचार.

**२ ब्राह्मण**—आपण कोण महाराज ?

**जोति०**—आम्ही मोठ्ठा ज्योतिष्यी आहे.

**१ ब्राह्म०**—केवढा—एवढा ? ( दोन्ही हात पसरून दाखवितो)

**जोति०**—मोठा—मोठ्ठा आहे. हें मानपत्र बघा. (गुंडाळें सोडतो)

**२ ब्राह्म०**—अ-ब्-ब्-ब् ! अरे ही तर तुझ्या माझ्या पूर्वजांची आठ दहा पिढ्यांची वंशावळ !

**१ ब्राह्म०**—महाराज, आपण मोठा ज्योतिषी आहांत, मी एक प्रश्न विचारतों—

**जोति०**—प्रश्न विचारितो—नको. फक्त—

**२ ब्राह्म०**—प्रश्न नको विचारूं ? मग तूं कसलें आपल्या डोचक्याचें ज्योतिष पहातोस ?

**ज्योति०**—( रागानें ) डोचका काय पाहतो. आह्मांला फक्त देवाचें नांव सांगा. आम्ही तुमचा प्रश्न सांगते, उत्तरहि सांगते. आम्ही मोठ्ठा ज्योतिष्यी असतो.

**२ ब्राह्म०**—असें—असें ! प्रश्नहि सांगतां आणि उत्तरहि सांगतां ? ( मित्राकडे पाहून ) पडला बेटा विचारांत ! देवाचें नांव नसेल आठवत तर सांग घरांतल्या देवींचें.

**१ ब्राह्म०**—ऐकरे बुवा, काय थट्टा आहे ! हँ महाराज, सांगतों—श्री विठ्ठल.

**२ ब्राह्म०**—( त्याला वेडावून ) अहाहा ! आतां विठ्ठल विठ्ठल करा आन् हातांत जपमाळ धरा ! चांगलीं देवींचीं नांवें तिलोत्तमा, सर्वोत्तमा, उर्वशी, रंभा, मेनका हीं सोडून ह्मणे विठ्ठल.

१ ब्राह्म०—( त्याला चापट मारून ) तूं अशानें ऐकायचा नाहींस. काय ही प्रत्येक कामांत थट्टा ?

ज्योति०—( नाकाला दोन बोटें लावून बोटें चाळतो. ) तुमचा प्रश्न—' उद्यां दक्षणा काय ? '—

२ ब्राह्म०—अहाहा ! एवढा द्राविडी प्राणायाम करून शेवटीं दक्षणा काय, हाच का प्रश्न विचारलास ! मी समजत होतों कीं, तूं आपला तो ( डोळ्यानें खूण करून ) प्रश्न विचारलास.

१ ब्राह्म०—अरे वेड्या, पैशाशिवाय कसला आला आहे तो प्रश्न ! सकाळीं दोन घटका पळी पंचपात्री हालविली कीं, आहेच तो प्रश्न. पण ह्याशिवाय ( पैशाची हातानें खूण दाखवून ) त्या प्रश्नाला काय मजा आहे.

२ ब्राह्म०—खरें रे खरें ! तूं तरी बराच पाताळयंत्री आहेस.

ज्योति०—उद्यां मोठा दक्षणा ( पांच बोटें दाखवून ) मोहरा मिळतो, भोजन सुग्रास मिळतो.

२ ब्राह्म०—पांच मोहरा दक्षणा ! अब्—ब्—ब्—आणि वर सुग्रास भोजन—अरे वाः ? मग तर काय—लाट !

( एकमेकाला टाळी देतात आणि जातात. )

जोति०—पण आम्हाला दक्षणा नाहीं दिले. हें काय हें गांवचा न्याय आहे. ए भटो—ए भटो— ( त्यांच्या मागें पळत जातो. )

---

## अंक ] प्रवेश ५ वा. [पांचवा.

—:०:—

स्थळ—उदयसिंगाच्या वाड्याची वेस.

( प्रमोदिनी आणि चंपावती प्रवेश करतात. )

प्रमो०—( आईच्या खांद्यावर हात ठेवून ) आई हा आजचा

दिवस आतां निघून जाईल. एखादी गोष्ट प्रथमच जरा अवघड वाटतें खरी, पण जेव्हां त्या गोष्टीचा आपणाला जास्त सहवास घडतो तेव्हां आपोआप ती गोष्ट आपल्या अंगवळणी पडते. माझ्या-विषयीं तूं बिलकुल खंती होऊं नकोस. मन खंबीर करून मी इतका धीर धरला आहे, आणि तूं कां अशी खिन्न ? कां बरं तूं आपल्या मनाला वाईट वाटूं देतेस ?

**चंपा०**——नाहीं बाळ. मी अगदीं शांत आहें. नाहीं कां मी शांत दिसत ?

**प्रमो०**——होय. असाच—असाच शांतपणा आतां आपल्याला धरला पाहिजे. आई, मीं जर आपल्या उच्च कुळाला योग्य असा रजपुताचा शब्द राखला नाहीं—राजाज्ञा मानली नाहीं तर, बाबांना किती—किती वाईट वाटेल बरं! काल बाबा म्हणत होते——लग्न झाल्यावर मी सुखी होईन; आणि आई, माझीहि खात्री आहे, जर मी सत्यपराङ्मुख झालें नाहीं तर खास——खास सुखी होईन!—पण आई, मला एकदां तुला हांसलेली पाहूं दे म्हणजे मी खरो-खरच सुखी होईन.

**चंपा०**——( स्वगत ) काय हा निश्चय! रजपूत तेज म्हणतात तें ह्यालाच! आपल्या पित्याचा शब्द गुंतला आहे तो खरा करण्या-करितां माझ्या दृढ निश्चयी लाडकीनं किती लोकोत्तर धैर्य दाखविलं आहे हें! आपल्या सर्व सुखावर पाणी सोडलं—आपल्या प्रेमाला आंतल्या आंत जाळून टाकलं. देवा! अशा दृढनिश्चयी, शुद्ध अंतः-करणाच्या माझ्या लाडकीचं पुढलं सर्व आयुष्य दुःखांत जावं ना? ( उघड ) बाळे, माझ्या हांसण्यापासून खरोखर जर तुला सुख होत

असेल तरी ही पहा मी हांसलें. ( हंसत दोघी एकमेकींला मिठ्या मारतात. पुरोहित येतो.)

पुरो०—चला, ताईसाहेब, सर्व तयारी आहे.

चंपा०—चला. चल बाळे— ( जातात.)

( लग्न मंडप. राजा मानसिंग, उदयसिंग, इतर सरदार, मानकरी आणि एका बाजूला वरपोशाखानें रुपसीसिंग उभा आहे आणि चंपावती व प्रमोदिनी उभी आहे असा देखावा )

पुरो०—महाराज, लग्नघटका भरत आल्या. देवालयांत जाण्याची सर्व तयारी आहे.

राजा—ठीक आहे. वधु–वराला घेऊन चला.

( इतक्यांत ' अन्याय, अन्याय ' असा पडद्यांत शब्द होतो. थोड्या वेळानें अस्ताव्यस्थ कपडे झालेला गर्जेंद्रसिंग एकदम पुढें येतो. )

राजा—( आश्चर्यानें ) कोण गर्जेंद्रसिंग ?

रुपसी०—( स्वगत ) घात झाला ! घात झाला ! !

प्रमो०—नाथ—( उदयसिंगाच्या बाहूंत बेशुद्ध पडते. )

चंपा०—( पुढें होऊन हात पसरते ) गर्जेंद्रा ! गर्जेंद्रा ! ! बाळा ! ! !

गर्जेंद्र०—नाहीं, नाहीं; आईसाहेब मागें व्हा. तुमच्या पवित्र हाताला मला स्पर्श करतां येत नाहीं. ह्या देहाला खून केल्याचा घाणेरडा डाग लागला आहे, तो ह्या तरवारीनें साफ धुऊन काढल्याशिवाय आपल्या पवित्र हाताला मी कधींही स्पर्श करणार नाहीं. ( मानसिंगाकडे वळून ) महाराज, एका वृद्ध मनुष्याचा खून केल्याचा मजवर आरोप ठेवून आपल्या हुकमावरून रुपसीसिंगानें मला कैद केलें आहे. ईश्वरसाक्ष हा अगदीं असत्य आरोप त्यानें मजवर ठेवला, म्हणून त्याला हुडकून काढण्याकरितां मी येथें धांवत आलों आहें. आपल्या चरणाला साक्ष ठेवून त्यानें मजबरोबर युद्ध करावें

आणि मला ठार मारून माझ्यावरच्या गुन्ह्याची शाबिती करावी. युद्धांत तो हरल्यास ह्याच गुन्ह्याची शाबिती मी त्याच्यावर करतों. मी सरदार आहें, तेव्हां त्याच्याबरोबर द्वंद्युद्ध करण्याचा मला पूर्ण अधिकार आहे. माझी खात्री आहे, माझ्या ह्या सरळ विनंतीचा दयावंत महाराज कधींहि अव्हेर करणार नाहींत.

( मानसिंग रुपसीसिंगाकडे पाहतो. )

**रुपसी०**—महाराज, बोलूनचालून हा खुनी! हातींबोटीं आलेला तेवढा हा समारंभ उरकून, मग त्याचा विचार करूं.

**गजेंद्र०**—( तिरस्कारानें ) गप्प, नामर्दा ! कसला करतोस समारंभ ! तुझ्यासारख्या पाप्याकडून त्या साध्वीचा मी कधींही उपमर्द होऊं देणार नाहीं. महाराज, मला आतांच योग्य न्याय मिळाला पाहिजे.

**राजा**—गजेंद्रसिंगा, तूं युद्धाची इच्छा दर्शवितोस खरी, पण रूपसीसिंग किती कसलेला आणि सशक्त माणूस आहे याची कांहीं कल्पना तुला!

**गजेंद्र०**—सरकार, मी जर खरा निर्दोषी आहें, तर त्याचा सशक्तपणा माझ्या कसाला लावा; आणि माझ्या अंगीं काळा डाग असल्याची आपणां सर्वांची जर कल्पना असेल तर खुशाल मला युद्धांत मरूं द्या.

**राजा**—( सर्व लोकांकडे पाहून ) माझे सर्व सरदार लोकहो ! आजच्या मंगलकार्यांत मध्येंच हें एक प्रकरण उपस्थित झालें. आपण आतां ऐकलेल्या हकीकतीवरून हें प्रकरण लांबणीवर टाकतां येत नाहीं. म्हणून गजेंद्रसिंगानें मागणी केलेल्या सरदारी इनसा-

फाची मी त्याला परवानगी देतों–( स्त्रियांकडे वळून ) सर्व स्त्रियांनीं वाड्यांत जावें.

( सर्वजण बाजूला होतात. स्त्रिया माडीच्या गच्चीवर जातात. शिपाई युद्धाची जागा तयार करतात. )

रुपसी०—( स्वगत ) आतां ह्याला ठार मारलाच पाहिजे.

गजेंद्र०—( तरवार उपसून ) चल, रूपसीसिंगा, हो पुढें. माझ्यावर तूं ठेवलेल्या आरोपाची शाबिती करण्याची मी तुला ही संधि देत आहें.

राजा—( हात वर करून खूण करितो ) सत्याचा जय होवो !

( दोघे लढतात. थोड्या वेळानें रुपसीसिंग पडतो. गजेंद्रसिंग त्याची तरवार उचलतो. )

गजेंद्र०—( रुपसीसिंगाची तरवार राजापुढें ठेऊन ) महाराज, ही माझ्या दोषी ठरलेल्या शत्रूची तरवार आणि ही माझी तरवार. ( आपली विजया ठेवतो ) आजपर्यंत ह्या तरवारीचा मीं कधींहि दुरुपयोग केला नाहीं, अथवा तिचा अपमान होऊं दिला नाहीं. आपण ज्या स्थितींत ती मला सरदारी देतांना दिली त्याच मानाच्या स्थितींत मी ही आपल्या चरणांजवळ ठेवतों.

राजा—( तरवार उचलून ) नाहीं, गजेंद्रसिंग, ही तरवार बाळगण्याला तुम्ही योग्य–योग्य अहांत. ( रुपसीसिंगाकडे वळून ) पकडा त्या हरामखोराला ! गजेंद्रसिंग, तुमच्या निर्दोषीपणाबद्दल माझी पूर्ण खात्री झाली.

[ दोन शिपाई रुपसीसिंगाला पकडतात. उदयसिंग गजेंद्रसिंगाला पोटाशीं धरतो. माडीवर ‘ माझे नाथ निर्दोषी ’ अशी प्रमोदिनी किंकाळी फोडते. इतक्यांत चार भोई एक मोडका मेणा आणून त्या गर्दीत ठेवतात. ]

**गजेंद्र॰**—( आश्चर्यानें ) कोण ! बैरागी !! जिवंत आहे—अहाहा ईश्वरा, तुझी लीला अगाध आहे ! ( मेण्यांत वांकतो )

**बैरागी**—( खोल आवाजांत ) होय बाळा गजेंद्रा, मी जिवंत आहें आणि माताजीहि जिवंत आहेत. ( त्याच्या गालावरून हात फिरवितो. )

**राजा**—हा काय गोंधळ आहे ! हा मनुष्य कोण ?

**गजेंद्र॰**—महाराज, हाच तो वृद्ध मनुष्य. ज्याला ठार मारल्याबद्दल मला दोषी ठरविलें होतें. आतां खरी खरी हकीकत महाराजांनीं त्याच्याच तोंडून ऐकावी.

**राजा**—वृद्ध मनुष्या, तुला ठार मारण्याचा कोणीं प्रयत्न केला होता काय ?

**बैरागी**—होय महाराज, त्या मनुष्याचा हेतु बहुतेक सफलहि झाला. कारण, थोड्या वेळानें मी मरणार अशी माझी खात्री आहे. परंतु मरणापूर्वीं महाराजांना खरा दोषी—खरा खुनी दाखवावा, म्हणून हा प्राण कंठीं धरिला आहे.

**राजा**—तो दोषी मनुष्य कोण हें तुला माहीत आहे काय ?

**बैरा॰**—होय महाराज, तो येथेंच आहे. आपली आज्ञा होईल तर सर्व सांगतों.

**राजा**—सांग, तुझी सर्व हकीकत सांग.

**बैरा॰**—बटेवाच्या जंगलांत एक अनाथ बाई रहात असे. तिची माझी फार जुनी ओळख. त्या गरीब बाईला शत्रू फार होते. दहा दिवसांपूर्वीं ती बाई संकटांत आहे असें कळतांच, मी तिच्या रक्षणार्थ गेलों. परंतु त्या वेळीं ती बाई तेथें नव्हती. मीं तिचा पुष्कळ शोध केला. कांहीं वेळानें मला घोड्यांच्या टापा ऐकूं

आल्या. घोड्यावरून येणारा बहुतकरून गजेंद्रसिंग असावा असें मला प्रथम वाटलें, कारण तोहि तिच्या हितचिंतकांपैकीं एक आहे. मीं मागें वळून पाहिलें, तों रुपसीसिंग उभा असलेला माझ्या दृष्टीस पडला. त्यानें मला ' ती बाई कुठें गेली ' म्हणून प्रश्न केला. तो तिचा शत्रु असल्यामुळें मीं कांहीं एक उत्तर दिलें नाहीं. त्याबरोबर त्यानें म्यानांतून तरवार काढून म्हटलें ' तूं सांगितलें नाहींस तरी ती माझ्या हातून सुटत नाहीं, आणि तूंहि सुटत नाहींस. ' नंतर त्यानें मजवर वार केला. त्याबरोबर जखमी होऊन मी बेशुद्ध पडलों. ही पहा जखम. ( जखम दाखवितो. )

रुपसी०—महाराज, ह्या खोट्या गोष्टीवर कोणीतरी विश्वास ठेवील काय ?

राजा—( रागानें ) होय, मी ठेवीन. त्याचा प्रत्येक शब्द मला खरा वाटत आहे. पुढें सांग ?

बैरा०—नंतर मी शुद्धीवर आलों, त्यावेळीं गजेंद्रसिंग माझ्या जखमा बांधीत होता. बोलण्याची किंवा हालचाल करण्याची मला बिलकूल शक्ति नसल्यामुळें मी मृतप्राय पडलों होतों. इतक्यांत रुपसीसिंग पुनः आला, आणि ' तूंच खून केलास ' असें त्याला म्हणाला. त्यावरून गजेंद्रसिंगाला चिरड येऊन उभयतांची चकमक उडाली. त्यांत रुपसीसिंग हार घेऊन पळाला. मग मी पुनः बेशुद्ध झालों, तो काल शुद्धीवर आलों. इतक्यांत ह्या चांडाळाबरोबर—( रुपसीसिंगाकडे बोट दाखवून ) ह्या जिवंत समंधाबरोबर—प्रमोदिनीचें लग्न होणार आहे असें कळतांच, ही माझ्या संबंधाची खरी हकीकत, त्याशिवाय ह्या कसाबाच्या दुसऱ्या कांहीं नीच गोष्टी,

महाराजांच्या कांनीं घालाव्यात म्हणून कसाबसा जीव मुठींत धरून या ठिकाणीं एकदांचा येऊन दाखल झालों.

राजा—पण तूं कोण? तुझें नांव काय?

बैरागी—काय! महाराजांनीं मला अद्याप ओळखलं नाहीं?

राजा—( त्याला न्याहाळून पाहतो. ) तूं—सहिदसिंग!—माझ्या सौख्यमंदिराचा सर्वतोपरी विध्वंस करणारा सहिदसिंग! उदयसिंगा, ह्याला माझ्या दृष्टीआड ने. गत गोष्टींची आठवण देऊन, त्या दुःखभारानें माझ्या हृदयाची कालवाकालव करून, दुःखावर डागण्या देण्याकरितां याला येथें क्षणभरही राहूं देऊं नका.

( सर्वजण आश्चर्यानें बैराग्याकडे पाहतात. )

बैरागी—दृष्टीआड नेण्याचा हुकूम कशाकरितां देतां महाराज! थोड्या वेळानें मी ह्या जगाआडच होणार आहें. पण महाराजांनीं माझी आणखी एक गोष्ट ऐकावी. त्यापासून महाराजांच्या निष्काम विकारवश होऊन चलबिचल झालेल्या मनावर पुष्कळ परिणाम होईल.—बऱ्याच वर्षांमागें ह्या जयपुरांत एक लग्न झालें. त्या मुली-सारखी पतिव्रता स्त्री कोठेंहि आढळणें क्वचित्! तिच्यावर एका पापी मनुष्याची पूर्वींपासून नजर होती. आपला कार्यभाग साधावा म्हणून त्या दुष्टानें तिच्या पतीजवळ नोकरी धरली. त्या मनुष्याचा जन्म अगदीं हीन कुळांत झालेला, तथापि आपल्या अंगच्या डाव-पेंचांनीं लवकरच त्यानें आपल्या धन्यावर पगडा बसवून आपल्या नीच कारस्थानाला सुरवात केली. पुढें, गावांतून एक गुंड तयार करवून त्याच्या बरोबर तिचा वाईट संबंध आहे असें त्या भोळ्या सांबाला भासविलें. शेवटीं त्या हलक्या मनाच्या धन्याला आपल्या बायकोचा इतका संशय आला कीं, त्यानें कोणत्याहि गोष्टीचा विचार

कल्योशिवाय तिला—त्या साध्वीला ठार मारण्याकरितां मारेकरी पाहिला. महाराज तोच मारेकरी मी.

**राजा**—बस्स—सहिदसिंगा, मीं पुष्कळ ऐकलें ! तूं त्या साध्वीला —माझ्या प्रमिलेला—मारून आपल्या पापांत भर टाकलीस. हाय ! हाय ! (दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेतो.)

**बैरागी**—नाहीं महाराज. त्या साध्वीचा मीं खून केला नाहीं. कारण त्या वेळीं राणीसरकारांना कांहीं महिने लोटले होते. मीं त्यांचा फार गुप्त रीतीनें सांभाळ केला. पुढें लवकरच त्या प्रसूत होऊन पुत्ररत्न प्रसवल्या. नंतर तें बालक मोठ्या चातुर्यानें उदयसिंगाच्या हातीं लागेल असें आम्हीं केलें. तोच हा राजकुलोत्पन्न शूरवीर **गजेंद्रसिंग.**

(सर्वजण आश्चर्यानें थक्क होतात. राजा मानसिंग गजेंद्रसिंगाला हृदयाशीं धरतो.)

**राजा**—(रागानें रुपसीसिंगाकडे वळून) चांडाळा, रुपसीसिंगा, माझ्या सर्व दु:खाला कारण तूं—

**बैरागी**—थांबा महाराज, मला आतां थोडेंच सांगायचें उरलें आहे. राजपुत्राची तशी ती व्यवस्था केल्यावर राजमातेला गुप्त रीतीनें मीं ठाणेश्वरीं नेऊन ठेविलें. नंतर, इतक्या वर्षांनीं येथें शांतता झाली असेल असें समजून, आम्हीं नुकतेंच अरवलीच्या पहाडांत येऊन राहिलों. परंतु ती बातमी ह्या दुष्टाला कळून आह्मांला मारण्याचा चार वेळां ह्यानें प्रयत्न केला.

**राजा**—(त्वेषानें) आतां आलें लक्षांत !

(इतक्यांत रजपूत आणि त्याची स्त्री प्रवेश करतात.)

**रजपूत**—(मुजरा करून) सरकार, माझी एक फिर्याद आहे.

थोड्या दिवसांपूर्वीं ह्या चांडाळानें माझ्या ह्या स्त्रीच्या पातिव्रत्यावर हल्ला करण्याचा प्रयत्न केला.

**राजा**—( संतापानें रुपसीसिंगाकडे वळून ) अरे दुष्टा—

**रज०**—परंतु ऐन वेळेवर ह्या छोट्या महाराजांनीं ( गजेंद्रसिंगाला मुजरा करतो ) तिचें रक्षण केलें.

**राजा**—रुपसीसिंगा, दुष्टा! आतां मात्र तुझ्या पापाचा घडा पूर्ण भरला. चांडाळा हें घे प्रायश्चित्त—( त्वेषानें त्याच्यावर एकदम जोरानें वार करतो. रुपसीसिंग मृतप्राय होऊन पडतो. )

**बैरा०**—( आनंदानें ) शेवटीं सत्याचाच जय झाला!

( इतक्यांत चोर दरवाजा उघडतो. आणि शुभ्र कफनी घातलेली प्रमिला येते )

**राजा**—कोण प्रमिला! ( प्रमिला धांवत येऊन त्याला आलिंगन देते, आणि कफनी काढते. ) प्रमिले—माझ्या प्राणा! या अधम, पापी, चांडाळानें तुला फार फार छळलें. या दुष्ट मानसिंगाला तूं क्षमा करशील? (ती क्षणभर प्रेमयुक्त दृष्टीनें त्याच्याकडे पाहून त्याला मिठी मारते. इतक्यांत प्रमोदिनी धांवत येऊन गजेंद्रसिंगाला मिठी मारते. )

**प्रमिला**—चंपावती बाई, तुमचे मजवर फार उपकार झाले. आतां सगळ्यांना आनंदी करण्याचें काम तुमच्याकडे आहे. माझें एवढें एक काम करा—ही तुमची लाडकी प्रमोदिनी मला—

**चंपा०**—( मध्येंच ) माई सरकार, आपण मागण्यापूर्वीच ती आपली झाली आहे.

राजा—आजचा हा आनंदाचा दिवस दाखविणारा हा सहिदसिंग.

सहिद०—तुह्मां सर्वांना आनंदी झालेले पाहून मला फार आनंद झाला. ईश्वर तुह्मां सर्वांना सुखी ठेवो!

सर्व—तथास्तु!



समाप्त.